# प्रस्तावना.

गेल्या वर्षापासून मॅट्रिकच्या परीक्षेत इतिहास विषयाच्या प्रश्नांचीं उत्तरें देशीभाषेंत देण्याची सवलत दिली गेली आहे व या सवलतीचा फायदा घेण्याची पुष्कळ विद्यार्थ्यांची इच्छा आहे. पण मराठी भाषेंत इतिहासाच्या परीक्षेस उपयुक्त अशीं फारशीं पुस्तकें नसल्यामुळें ती अडचण थोड्या फार अंशानें दूर करण्याच्या उद्देशानें हें पुस्तक लिहिण्याचें धाडस केलें आहे. या पुस्तकांतील प्रश्नांची रचना व मांडणी अशा रीतीनें करण्यांत आली आहे कीं हें पुस्तक हायस्कूलमधील ४ थी, ५ वी, ६ वी व सातवी या सर्व इयत्तांतील विद्यार्थ्यांना उपयुक्त होईल.

हें पुस्तक लिहितांना इंग्रजी व मराठी भाषेंतील इंग्लंडच्या इतिहासावरील अनेक ग्रंथांचा उपयोग झाला त्याबद्दल त्या त्या ग्रंथकर्त्यांचा प्रस्तुत लेखक फार आभारी आहे. त्याचप्रमाणे 'बलवंत मुद्रणालया'चे मालक श्रीयुत ग. वि. पटवर्धन यांनी हें पुस्तक तातडीनें छापून दिल्याबद्दल व प्रुफें तपासण्याची व पुस्तकाच्या प्रकाशनाची जबाबदारी आपल्या शिरावर घेतल्याबद्दल माझे मित्र श्री. भालचंद्र विष्णु भाटवडेकर यांचे आभार मानणे आवश्यक आहे.

रत्नागिरी,
ता. १।२।२७.

ग्रंथकर्ता.

# A Guide to the History of England.

## "इंग्लंडच्या इतिहासाचें गाईड"

अथवा

# "आंग्लेतिहासमार्गदर्शक."



## भाग पहिला.



## ट्यूडर कारकीर्द.

१ ट्यूडर घराणें इंग्लंडच्या गादीवर आलें तेव्हांपासूनच इंग्लंडच्या इतिहासांतील अर्वाचीन युगाला सुरवात झाली असें म्हणतात तें कां तें सांगा:—ट्यूडर राजे इंग्लंडच्या गादीवर आले त्या वेळीं इंग्लंडमधील अंतस्थ युद्धें नुकतींच संपलीं असून सर्व सत्ता राजाच्या हातांत केंद्रीभूत झाली होती. प्राचीन कला व विद्या यांचें युरोपमध्यें पुनरुज्जीवन होऊन, आचार व विचार नवीन वळणावर जात होते. अशा रीतीनें राजकीय, धार्मिक, सामाजिक, शैक्षणिक व भौगोलिक परिस्थितीमध्यें नावीन्य दिसत असल्यामुळें याच सुमारास अर्वाचीन युगाला सुरवात झाली असें मानण्यांत येतें.

२ थोडा पूर्वेतिहास या:—दोन हजार वर्षांपूर्वी इंग्लंड हा देश रानटी स्थितींत असून येथील लोकांना ब्रिटन असें म्हणण्यांत येई. इ. स. पूर्वी ५५ व्या वर्षी, त्यावेळीं सार्वभौम असलेल्या रोमन साम्राज्याचा विख्यात सेनापति ज्यूलिअस सीझर यानें तो प्रदेश जिंकला. रोमन लोकांची सुधारणा फारच वरच्या दर्जाची होती व त्यांच्या

सहायासानें इंग्लंड देश सुधारला व त्याची भरभराट होऊं लागली. पण पुढें इ. स. ४१० मध्यें रोमन सैन्य स्वदेश संरक्षणार्थ इंग्लंडमधून निघून गेलें तेव्हां निराश्रित झालेल्या इंग्लंडवर ॲंगल्स, सॅक्सन, ज्यूट्स वगैरे लोकांनीं हल्ले करून तेथें आपापलीं लहान लहान राज्यें स्थापिलीं.

इंग्लंडमध्येंच यॉर्क व लँकेस्टर या दोन प्रतिस्पर्धी घराण्यांमध्यें राज्यपदासाठीं "गुलाबाचीं युद्धें" ( Wars of the Roses ) या नावानें प्रसिद्ध असलेलें युद्ध झालें. शेवटीं लँकॅस्ट्रिअन घराण्यापैकीं **हेनरी ट्यूडर** यानें यॉर्क घराण्यातील राजा ३ रा रिचर्ड याचा **बॉस्वर्थच्या** लढाईंत इ. स. १४८५ सालीं पराभव केला व हें आपसांतलें युद्ध संपलें. **हाच ट्यूडर घराण्यांतील पहिला राजा होय.**

३. ट्यूडर वंशवृक्ष घ्याः—

सातवा हेनरी
( १४८५–१५०९ )



**परकीन वॉरबेकनेंही** आयर्लंडमध्येंच आपण "रिचर्ड ऑफ यॉर्क" आहों असें सांगून बंड उभारलें बर्गंडीचा राणी मार्गारेट हिनें हा आपला भाचा आहे असें जाहीर करून त्याला पाठबळ दिल्यामुळें व स्कॉटलंडचा राजा जेम्स यानें त्याला आपली चुलत बहीण कॅथेरीन् हा देऊन मदत केल्यामुळें वॉरबेकचें बंड फारच फैलावलें कॉर्नवालमधील बंडाचा त्याने फायदा घेण्याचा प्रयत्न केला पण त्यांत यश न येऊन तो १४९७ त हेनरी या स्वाधीन झाला हेनरानें त्याला लंडनच्या तुरुंगात ठेविलें परंतु तेथें अर्ल ऑफ वॉरविक् याजबरोबर संगनमत करून तुरुंगांतून निसटून जाण्याचा प्रयत्न केल्यामुळें हेनरानें दोघांसही फाशी दिलें.

९ टिप्पणे लिहा (write short note on)—
(१) लिव्हरी आणि मेन्टेनन्स. (२) स्टार चेंबर कचेरी. (३) बेनीव्होलन्स् (४) मॉर्टनचा चिमटा. (५) पॉयनिंगचा कायदा

(१) हेन्री गादीवर यण्यापूर्वीचा बराचसा काल युद्धें व अंतस्थ भांडणें यांचे धामधुमीचा असल्यामुळें सरंजामशाहीचें प्रस्थ फारच माजलें होतें याची सत्ता व महत्व विशेष वाटण्याचें कारण हटलें ह्मणजे सरदार लोक आपल्या तैनातीस पुष्कळ माणसें ठेऊन त्यांना आपल्या घराण्याचा युनिफॉर्म व शिक्का देऊन आपल्या भांडणांत त्यांची मदत घे ते लोक आपआपल्या धन्यास दिलेला पेहेराव वापरीत असल्यामुळें त्या पद्धतीस लिव्हरी आणि मेंटेनन्स (पेहेराव आणि पाळणूक) असें ह्मणत उमरावांचा सत्ता कमी करण्याच्या इरादानें हेनरीने या पद्धती विरुद्ध बरेच कायदे पास करून घेतले

(२) जे सरदार पेहराव व पाळणुकीच्या कायद्याविरुद्ध वागतील त्यांची चौकशी करण्याकरितां त्यानें **स्टार चेंबर** नावाची एक कचेरी स्थापन केली. (१४८७) या कोर्टाचे न्यायाधीश राजाचे प्रधानच

असल्यामुळें ते सामान्य न्यायाधिशांप्रमाणें बड्या सरदारांना शासन करण्यास मुळींच कचरत नसत. अमीर उमरावांना ताळ्यावर आण-ण्याचें कार्य या कोर्टानें उत्तम रीतीनें बजावलें. पण पुढें पुढें राज्यकर्ते या कोर्टाचा दुरुपयोग करून ते राजाच्या मनाविरुद्ध वागणाऱ्या सर्व लोकांविरुद्ध उपयोगांत आणूं लागल्यामुळें, लाँग पार्लमेंटने स. १६४१ मध्ये बरखास्त केलें.

(३) पार्लमेंटच्या संमतीशिवाय जरी राजाला कोणताही कर वसूल करण्याचा अधिकार नव्हता तरी ट्यूडर राजानें पैसा मिळ-विण्याचे अनेक मार्ग होते. कायदेशीर रीतीनें कर घेता येत नव्हता. पण नजर नजराणा किंवा "बेनिव्होलन्स" ह्मणजे "धर्मार्थ देणगी" मागूं नये असा कायदा नव्हता. या देणग्यांना जरी "धर्मार्थ" असें ह्मणण्यात येत होतें तरी वस्तुतः त्या जुलमाच्याच देणग्या असत

(४) मॉर्टनचा चिमटा:—वरील देणग्या वसूल करण्याचें काम राजाचा मुख्य मंत्री मॉर्टन हा च करीत असे. जे श्रीमंतीनें रहात असत त्यांना "तुम्ही श्रीमंत आहां ह्मणून देणगी देण्यास तुह्मांला मुळींच हरकत नाहीं" व जे गरीब होते त्यांना "तुम्ही गरीबीत राहून पुष्कळ शिल्लक करून ठेविली असली पाहिजे" असें तो ह्मणत असे. या त्याच्या निरुत्तर कोटीमुळें कोणाचीच सुटका होत नसे व त्याच्या या उपायास मॉर्टनचा चिमटा असें म्हणतात. (Morton's fork

(५) पॉयनिंगचा कायदा:—यॉर्किस्ट बंडवाल्यांना आयर्लंडांत मोकळें मैदान मिळत असल्यामुळें, आयर्लंडचा बंदोबस्त करण्याकरितां हेनरीनें सर एडवर्ड पॉयनिंग याची नेमणूक केली होती. "इंग्लंडच्या राजाच्या संमती शिवाय आयरिश पार्लमेंट भरविण्यांत येऊं नये व

कोणताही कायदा पास करता येऊं नये" असा त्याने १४९४ मध्यें एक कायदा पास करून घेतला त्याला पॉयें निगज् लॉ असें म्हणतात.

**१० आर्वाचीन युगाच्या प्रारंभींच्या दर्यावर्गील सफरींची हकीकत देऊन त्यांचें महत्व आणि परिणाम सांगाः—**

पंधराव्या शतकाचा उत्तरार्ध व सोळावें शतक हीं दोन शतकें युरोपच्या इतिहासांत *"शोध व सुधारणा याचें युग"* या नांवानें प्रख्यात आहेत. अटलांटिकच्या दुसऱ्या कडेला हिंदुस्थान आहे अशी बरेच दिवस युरोपिअन लोकांची समजूत होती व ते शोधून काढण्याकरितां प्रयत्न केले जात होते इ. स. १४९२ सालीं प्रख्यात दर्यावर्दी कोलंबस हा याच रस्त्यानें प्रवास करण्याकरितां निघाला व त्याला अमेरिकेचा किनारा लागला. त्यालाच त्यानें हिंदुस्तान समजून ( Indies ) असें नांव दिलें. परंतु उत्तर अमेरिकेच्या मुख्य भागाचा व लॅब्राडोरचा शोध जॉन कॅबट व त्याचा मुलगा सेबॅस्टिअन कॅबट यानीं लाविला. येथपर्यंत उत्तरअमेरिकेचाच किनारा त्यांना सांपडला होता. पण त्यानंतर नावाडी लोक दक्षिणेकडे जाऊं लागले. प्रसिद्ध नावाडी मॅगेलन हा मॅगेलेनची सामुद्रधुनी ओलांडून पलीकडे गेला त्याची गलबतें पृथ्वी प्रदक्षिणा करून ३ वर्षांनीं स्वदेशीं परत आलीं व त्याचवेळीं खरें हिंदुस्थान निराळें असून कोलंबसानें शोधलेली जमीन एक निराळेंच खंड आहे असें आढळून आलें. तेव्हां आता पूर्वेच्या दिशेनें प्रयत्न सुरू झाले.

पूर्वेकडजनें खुष्कीचा मार्ग होता. पण त्या मार्गावर तुर्क लोकांनीं आपली सत्ता बसविली असल्यामुळें, नवीन मार्ग शोधून काढणें भाग पडलें व त्या दिशेनें सुरू झालें. बार्थेलोमी डायझ् हा १४८६ सालीं केप् ऑफ् गुड्होप् येथें पोहोंचला. आणि वास्को-ड-गामा हा आफ्रिकेला वळसा घालून कालिकत येथें येऊन पोहोंचला. व

एकदां हिंदुस्थानचा मार्ग सांपडल्यावर बहुतेक राष्ट्रे आपली जहाजें हिंदुस्तानांत पाठवू लागलीं.

महत्त्व. —सोळाव्या शतकाच्या आरंभापर्यंत बहुतेक व्यापार भूमध्यसमुद्र, इजिप्त व अरेबिया या भागाच्यामार्फत चालत असे. पण अमेरिका खंड व हिंदुस्थानला जाण्याचा जलमार्ग हे माहीत झाल्यामुळें, अटलांटिक महासागराला बरेंच महत्व प्राप्त झालें. इतकें कीं "जगाच्या व्यापाराचा राजमार्ग" "The High-ways of World's commerce" असें त्याला नाव मिळालें. भूमध्य समुद्राचें महत्व संपलें व इंग्लंड, स्पेन, पोर्तुगाल, व इतर दर्यावर्दी राष्ट्रांचा अभ्युदय झाला व्यापाराची वृद्धि झाली. वसाहात करण्याकरिता अमेरिकेंत विपुल जागा मिळाल्यामुळें त्या बाजूला लोक जाऊं लागले दक्षिण अमेरिकेंत सोन्याच्या खाणी सापडल्या थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे युरोपखंड इतर खंडापेक्षां बलवत्तर झालें.

११ टिप्पणें लिहाः—( Write short notes on ):—
(१) कोलंबस, (२ वास्को-ड-गामा आणि (३) जॉन कॅबटः—

(१) कोलंबस हा इटालियन असून लहानपणापासून त्याला जलपर्यटनें करण्याची फार हौस असे. युरोपच्या पश्चिम दिशेला जमीन असून त्याच दिशेनें एकसारखा प्रवास केल्यास आशियाखंडाच्या पूर्व किनाऱ्याला मनुष्य येऊन पोंचेल असें त्याला वाटत असे त्यानें ही सफर करण्याचा निश्चय केला व पोर्तुगालच्या राजाकडे मदत मागितली, पण त्याला ती मिळाली नाहीं. अखेर स्पेनच्या मदतीनें तो आपल्या जगप्रसिद्ध सफरीवर निघाला. पण त्याचा उत्साह, धडाडी, आत्मविश्वास व दृढनिश्चय खलाशाचे अंगीं नव्हता. त्यामुळें त्याला फार त्रास सहन करावा लागला. परंतु अखेरीस १४९२ सालीं फेब्रुवारीच्या ११ तारखेस तो बहामा येथें येऊन पोहोंचला. अशा-

(२) त्याची अंमलबजावणी करण्याकरिता स्टार चेंबर नावाचें कोर्ट स्थापन केलें. आणि

(३) प्रधान व इतर अधिकाऱ्याच्या जागावर उमरावांची नेमणूक न करता शक्य तोवर आपल्या विश्वासांतील व मध्यम वर्गांतीलच लोक नेमले.

**१३ हेनरीचीं पैसे उकळण्याचीं साधनें काय होतीं तें सांगा:**--पार्लमेंटच्या संमती शिवाय जरी कायदेशीर रीतीनें कर बसविता येत नव्हता तरी त्याच्याजवळ पैसे मिळविण्यासाठी विपुल साधनें होतीं. उदाहरणार्थ —

१) धर्मार्थ देणग्या वसूल करणे

(२ हेनरीची खाजगी मिळकत बरीच मोठी होती.

(३) बटबाल्याच्या मिळकती जप्त करून आपल्या मिळकतीत दाखल करणे वगैरे

**१४ सातव्या हेनरीचें परराष्ट्रीय धोरण (Foreign policy) सांगा :**

परराष्ट्रीय राजकारणात इंग्लंडचा हात शिरकवून इंग्लंडचा दर्जा वाढविण्याचा हेनरीनें पुष्कळ प्रयत्न केले. त्याचें धोरण मुख्यत कोणत्याही राज्यकर्त्याला विशेष प्रबल होऊ न देता "सत्तेची समता' (Balance of power) राखणे हें होतें. स्पेनचा स्नेहसंबंध जोडण्यासाठीं यानें स्पेनची राजकन्या कॅथराईन हिचा आपला वडील मुलगा आर्थर व तो मेल्यावर दुसरा मुलगा हेनरी याच्याशीं विवाह लावून दिला. याच उद्देशानें त्यानें आपली मुलगी मार्गारेट हिचा स्कॉटलंडचा राजा चौथा जेम्स' याच्याशीं विवाह घडवून' आणला.

**१५ आठव्या हेन्‌रीच्या कारकीर्दीतील ठळक गोष्टी देऊन त्यांचें विवेचन करा.**

**ठळक गोष्टी.**

(१) फ्रान्सशीं युद्ध.

(२, स्कॉटलंडशीं युद्ध, फ्लॉडन फील्डची लढाई

(३) पोपशीं भांडण.

(४) ॲक्ट ऑफ सुप्रीमसी.

(५) मठांवरील धाड.

(६) नवीन विद्येचें पुनरुज्जीवन व सुधारणा.

**विवेचनः**—(१) इ. स. १५११ मध्यें युरोपमध्यें फ्रान्स विरुद्ध पोपच्या नेतृत्वाखालीं स्थापन झालेल्या "होली लीग" या संघामध्यें त्यानें भाग घेतला. त्याच्या सैन्यानें कॅलेजवळ गिनगॉट या ठिकाणीं फ्रेंच सैन्याचा मोड केला. या युद्धांत हेनरीला १ लक्ष रुपये मिळाले.

( २ ) स्कॉटलंड व फ्रान्स यांचें सख्य असल्यामुळें इंग्लीश सैन्य फ्लँडर्समध्यें आहे अशी संधी साधून स्कॉटलंडचा राजा चौथा जेम्स यानें उचल खाल्ली. पण फ्लॉडनफील्ड या ठिकाणीं लढाई होऊन स्कॉटिश सैन्याचा पुरा मोड झाला व स्वत जेम्स राजा मारला गेला.

[ ३ , व [ ४ ].— प्रश्न १६ पहा.

[ ५ ] .— प्रश्न १७ पहा.

[ ६ ] .— प्रश्न १८ पहा

**१६ हेनरीचें पोपशीं भांडण होण्यास काय कारणें झालीं तें सांगाः**—सातव्या हेनरीनें आपला वडील मुलगा आर्थर याचें स्पेनची राजकन्या कॅथेराइन हिच्याशीं लग्न लावून दिलें होतें. पण तो थोडक्याच दिवसांत मरण पावला. स्पेनचा स्नेहसंबंध तुटूं नये

म्हणून. हेनरीनें पोपच्या खास संमतीनें आपला दुसरा मुलगा ( आठवा हेनरी ) याच्याशीं कॅथेराइनचा पुनर्विवाह घडवून आणिला होता कारण वडील भावाच्या विधवेशीं लग्न करण्याची ख्रिश्चन धर्माप्रमाणें मनाई होती. तिच्यापासून त्याला मेरी नांवाची मुलगी झाली. पण मुलगा नव्हता. त्याचवेळीं कॅथेराईनच्या तैनातीस असलेल्या ॲनबुलीन् नांवाच्या सुंदर व मोहक स्त्रीवर त्याचें लक्ष गेलें म्हणून तो घटस्फोटाची संधी पाहूं लागला. पण इंग्लंडातील कायद्याप्रमाणें राजाला सुद्धा एकाचवेळीं दोन बायका करण्याची परवानगी नव्हती. तेव्हां कॅथरिन्शी काडीमोड करणें जरूरीचें होतें. व त्याकरितां त्यानें पोपची परवानगी मागितली. पण त्यामुळें पोपची स्थिती चमत्कारिक झाली. हेनरीसारख्या गृहस्थाला नाराज करणें त्याला जड वाटूं लागलें. पण त्यानें स्वत च लग्नाला परवानगी दिली असल्याकारणानें लग्नही बेकायदेशीर ठरविता येईना. या शिवाय कॅथेराईन ही स्पेनचा राजा पांचवा चार्लस् याची आत्या असून तो त्यावेळीं मोठ्या फौजेनिशीं इटालींत होता. तव्हा त्याचे मन दुखविणेंहा पोपला इष्ट नव्हतें. शेवटीं या प्रकरणाची चौकशी करण्याकरितां "कांपेजो" या नावाचा एक इटालिअन बिशप व कार्डिनल वुल्झे या दोघाना त्यानें आपले प्रतिनिधी नेमिले पण पोपचा परवानगी मिळण्याचे कामीं वुल्झेला यश न आल्यामुळें त्याला हनरीनें तावडतोब कामावरून दूर केले वुल्झेच्या अध पातानन्तर क्रॉमवेल व क्रॅनमर हे अनुक्रमे राजकीय व धार्मिक बाबतींत हेनरीचे मल्लागार झाले. क्रॅनमरनें पोपची धार्मिक सत्ता झुगारून देण्याचा मल्ला दिला नंतर क्रॅनमरनें हा कज्जा आपल्या धार्मिक कोर्टांत चालवून हेनरीला अनुकूल निकाल दिला. व हेनरीचें ॲनबुलीन्शीं लग्न झालें.

पोपची सत्ता झुगारून देण्यासाठा त्यानें १५३५ सालीं

(४) जॅन् ऑफ क्लिव्हजशीं लग्न. पण ती वेडसर आहे असें आढळून आल्यावर तिच्याशीं घटस्फोट.

५) कॅथराइन हॉवर्डशीं लग्न १५४०, वदचालीची असल्यामुळें १५४२ मध्ये तिचा शिरच्छेद केला.

(६) १५४३ कॅथेरइन पारशीं लग्न. ही नवऱ्यामागें जिवत राहिला व त्यच्या मरणानंतर तिनें सर् थॉमस (लॉर्ड) सीमोर यांच्याशी लग्न लाविलें.

**१९ आठव्या हेनरीचें परराष्ट्रीय धोरण कसें होतें तें सांगाः**--आठवा हेनरी गादीवर असता, फ्रान्स व स्पेन हीं युरोपमधील बलाढ्य राष्ट्रें असून त्याचे राजे फ्रान्सिस् व चार्लस हे एकमेकाचे प्रतिस्पर्धी असल्यामुळें एकसारखे युद्ध-प्रसंग उत्पन्न होत हेनरीनें नेहमीं कमजोर पक्षालाच साह्य करून **व समत्व** ( Balance of power ) राखणाचें धोरण स्वीकारलें असल्यामुळें संकटकालीं प्रत्येक पक्ष हेनरीच्या मदतीची याचना करीत असे. त्यामुळें परराष्ट्रीय राजकारणामध्यें इंग्लंडला महत्वाचे स्थान प्राप्त झालें

२० **"रिनासन्स्" आणि "रेफर्मेशन्" यांविषयीं तुम्हांस काय माहिती आहे**--इ. स. १४५३ मध्य तुर्क लोकांनीं कॉन्स्टॅंटिनोपल जिंकल्यामुळे, त्याच्या त्रासानें ग्रीक लोक युरोपच्या इतर भागात आश्रयार्थ हिंडू लागले. त्यामुळें ग्रीक विद्या व कला यांचा फार प्रसार झाला. ग्रीक व लॅटिन वाङ्मय व तत्वज्ञान यांचे विद्वान लोक अध्ययन करू लागले याच सुमारास छापण्याच्या कलेचा शोध लागल्यामुळें तर, या जुन्या विद्येच्या पुनरुज्जीवनाच्या चळवळीची लाट फारच झपाट्यानें युरोपच्या सर्व भागात पसरली. यालाच "रिनासन्स्" अथवा "विद्येचे पुनरुज्जीवन" म्हणतात

या पुनरुज्जीवननाचा परिणाम असा झाला की लोक सांगितल्या गोष्टीवर डोळे झांकून विश्वास न ठेवतां आपापल्या मनांत त्याज-विषयीं विचार करूं लागले. त्यामुळें एक मोठीच क्रांती घडून आली. सर्व धर्मपुस्तकें पूर्वी ग्रीक व लॅटिन भाषेतच असल्यामुळें फक्त विद्वानांना मात्र वाचता येत. पण आतां तीं बहुजनसमाजाला वाचता येऊं लागलीं. त्यामुळें मूळ पुस्तकांत ख्रिस्ताच्या आज्ञा काय होत्या व पोप आणि त्याचे अधिकारी ह्या त्याची अमलबजावणी कोणत्या तऱ्हेनें करीत असत याची लोकांना बरोबर कल्पना आली व पोपचें ढोंग, लबाडी, व धर्मबाह्य वर्तन पाहून त्यांना त्याचा तिटकारा येऊं लागला. या मंडळींत मार्टिन् ल्यूथर हा मुख्य होता. त्यानें "इंडल्जन्स" अथवा क्षमापत्रांविरुद्ध मोहीम सुरू केली व धर्मालयाचे नियम व आचार यांतील दोष दाखविण्यास सुरवात केली; पोपनें त्याला बहिष्कृत केलें पण त्यामुळें ही चळवळ न थांबतां हळु-हळु इतर देशांत पसरली. या चळवळीस "रेफर्मेशन" अथवा "धर्मसुधारणा" असें ह्मणतात. व या नवीन पंथांतील लोकांना "प्रॉटेस्टंट" आणि पोपच्या पुरस्कर्त्यांना "कॅथोलिक" अशी नांवें पडलीं.

चालना मिळाली. प्रॉटेस्टंट पंथ स्वीकारण्याचा त्याचा उद्देश नव्हता; व त्याने तो पंथ स्वीकारला नाहींच. उलट त्या पंथातील पुष्कळांचा त्यानें छळ केला. तो सर्व बाबतींत जुन्याच मताचा होता. फक्त पोपची सत्ता त्यानें झुगारली होती पण त्याचा मुख्य धार्मिक सल्लागार क्रॅन्मर हा प्राटेस्टंट होता. तेव्हा जरी हेनरीचा तसा हेतू नव्हता तरी अप्रत्यक्षपणें त्याने सुधारणेस मदतच केली. यावरून हें स्पष्ट होतें कीं इंग्लंडांतील सुधारणेचा उगम राजकीय स्वरूपाचा असून त्याला धार्मिक वळण मिळालें. पण युरोपांतील सुधारणा प्रथम धार्मिक स्वरूपाची असून मागाहून तिला राजकीय स्वरूप प्राप्त झालें. (The reformation on the continent was a religious change, while that in England was a political move" or "The German reformation, religious in origin, became political the English reformation, political in origin became religious and then again more political than religious.")

२२ आठव्या हेनरीचा स्वभाव व कामगिरी यांचें वर्णन करा:—हा देखणा, हुशार, तरतरीत आणि विद्याव्यासंगी होता, त्याचप्रमाणे विलासी व चैनी होता. पण त्याचे मुख्य गुण म्हटले म्हणजे, धूर्तता, हट्टीपणा, महत्त्वाकांक्षा व स्वार्थीपणा हे होत. त्यानें पुष्कळ बेकायदेशीर व जुलमी कृत्यें केली पण केव्हांही ओरड झाली की तो सर्व जबाबदारी आपल्या प्रधानावर टाकून त्यांना तोंडघशीं पाडीत असे. वुल्झे व क्रॉमवेल यांना आपल्या स्वार्थासाठीं त्याने बळी दिले. गोल्डस्मिथ स्मिथ म्हणतात 'त्याच्या कारकीर्दीची गोष्ट थोडक्यांत म्हणजे निव्वळ "जारशाही" होय'

२३ थॉमस वुल्झेचें चरित्र लिहा:—वुल्झेचा जन्म इप्सविच येथें हलक्या कुळांत झाला होता पण आपल्या कर्तबगारीच्या जोरावर

तो धार्मिक खात्यांत यॉर्कच्या आर्चबिशपच्या जागेवर चढला असून राजकीय बाबतीत हेनरीचा मुख्य सल्लागार बनला होता. त्याची चिकाटी दांडगी असून दृढनिश्चय वाखाणण्याजोगा होता. तो अत्यंत महत्वाकांक्षी असून मोठ्या वैभवात आणि विलासात रहात असे.

तो कार्डिनल झाला असून पोपच्या पदावर आरूढ होण्याची त्याने इच्छा धरली होती. घटस्फोटाच्या प्रकरणात पोपकडून हेनरीला अनुकूल निकाल मिळण्यामध्ये त्याला यश न मिळाल्यामुळे हेनरीनें त्याला बडतर्फ केलें व चौकशीकरता लंडनला बोलाविलें असतां तो अधःपाताच्या धक्क्यानें वाटेतच मरण पावला.

२४ मार्टिन ल्यूथर विषयीं तुम्हास काय माहिती आहे? याचा जन्म जर्मनीत झाला व त्यानें तरुणपणींच मठाची दीक्षा घेतली. बायबल व इतर खिस्ती ग्रंथ यांत सांगितल्याप्रमाणें पोप व इतर धर्माधिकारी यांच्या हातून वर्तन होत नाहीं असें पाहून त्याला त्याची चीड आली. याच सुमारास "क्षमापत्रें" विकण्याकरितां कांहीं लोक जर्मनींत आले. तेव्हा त्यांच्याविरुद्ध ल्यूथरनें चळवळ केली व धर्मालयातील दोषांचें आविष्करण करणारें एक पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यामुळें पोपला राग येऊन त्यानें ल्यूथरला बहिष्कृत केलें. पण त्यामुळें ल्यूथरच्या मताचा जास्तच प्रसार झाला. या चळवळीला रेफर्मेशन हें नांव मिळून या नवीन मतांच्या अनुयायाना प्रॉटेस्टंट पंथ असें नांव प्राप्त झालें.

२५ "इंडल्जन्स" अथवा "क्षमापत्रकें" म्हणजे काय तें सांगा:—धर्मालयाला पैसा दिला म्हणजे पातकापासून सुटका होते असें धर्माधिकाऱ्यांकडून सांगण्यांत येऊन असलीं "क्षमापत्रकें" किंवा "पाप-मुक्तता-पत्रें" विकण्यांत येत असत. या क्षमापत्रानें ज्याची क्षमा होणार नाहीं असें पातकच नाहीं असें ते प्रतिपादन करीत. ल्यूथरनें त्यांचा जोरानें निषेध केला. हाच रेफर्मेशनचा उगम होय.

**२६ जॉन कोलेटची थोडक्यांत माहिती द्या**—नवीन विद्येचा (रिनासन्स्) इंग्लंडमधील पुरस्कर्ता जॉन् कोलेट हा होय. त्यानें धर्मपुस्तकें मुळांत वाचण्याकरिता ग्रीक व लॅटिन या भाषांचें अध्ययन केलें व नवीन विद्येचा प्रसार करण्याकरिता त्यानें पाठशाळा स्थापन केल्या. त्यापैकीं "सेंटपॉलची शाळा" ही मुख्य होय.

**२७ सर टॉमस् मूरविषयीं माहिती सांगा**:—या रिनासन्स् काळांत सर टॉमस मूर हा उदात्त पुरुष होऊन गेला. कुशाग्रबुद्धी, समयसूचकता व विद्वत्ता या गुणांबद्दल त्याची ख्याती होती. पण त्यापेक्षा "युटोपिया" या ग्रंथाचा कर्ता म्हणून त्याचें नांव विशेष प्रख्यात आहे. या पुस्तकामध्ये त्यानें सर्वांगपरिपूर्ण अशा काल्पनिक जगाचा आदर्श लोकांपुढें ठेविला. "ॲक्ट ऑफ सुप्रीमसी" कायद्याप्रमाणें पोपचा सत्ता अमान्य करून हेनरीलाच श्रेष्ठ अधिकारी मानण्याचें नाकारल्यामुळें त्याला हेनरीनें फाशी दिलें.

**२८ सहाव्या एडवर्डच्या कारकीर्दीचें थोडक्यांत वर्णन करा**:- हा आठव्या हेनरीच्या तिसऱ्या बायकोचा मुलगा असून गादीवर आला तेव्हा फक्त १० वर्षांचा होता. हेनरीनें मरतांना एक व्यवस्थापक मंडळ नेमलें होतें. पण हेनरीच्या मरणानंतर त्या मंडळाचा मुख्य व एडवर्डचा मामा हर्टफोर्ड सीमोर ऊर्फ **डयूक ऑफ सॉमारसेट** यानेंच सर्व सत्ता आपल्या हातीं घेतली. ता कट्टा प्रॉटेस्टंट होता. व क्रॅन्मरच्या सल्ल्यानें त्यानें चर्चमध्ये पुष्कळ सुधारणा घडवून आणल्या. पण तो उतावळा असल्यामुळें लवकरच अप्रिय झाला व त्याचे जागेवर **डयूक ऑफ नॉर्दंबलंड** आला. त्यानेही सॉमरसेटचेंच धोरण पुढे चालू ठेविलें. नॉर्दंबलंड हा पाताळयंत्री व स्वार्थी होता. एडवर्ड हा फार अशक्त व दुखणेकरी होता. तेव्हा तो फार दिवस जगणार नाहीं हे स्पष्ट दिसत होतें. तेव्हा त्याच्या पश्चातही सर्व कारभार

आपल्या हातीं रहाना ह्मणून नॉर्दंबलंडनें एक व्यूह रचला. त्याचा मुलगा लॉर्ड गिल्डफर्ड डडले याचें सातव्या हेनराचा कनिष्ठ मुलगा मेरी हिचा नात लेडी जेन ग्रे इच्याशीं लग्न लावून दिलें व एडवर्डनंतर लेडी जेन ग्रे गादीवर यावा अशा अर्थाच्या व्यवस्थापत्रकावर एडवर्डची सही मिळविली एडवर्ड मरताच लेडी जेन् ग्रेस गादीवर बसविण्यात आलें तिनें फक्त १२ दिवस नामधारी राज्य केलें लोकांचा पाठिंबा मेरीलाच होता. व त्याच्या साहाय्यानें मेरी गादीवर आली व लेडी जेन् ग्रेला देहान्त शासन देण्यात आलें

तंत्राने चालली होती. प्रॉटेस्टंट पंथाचा पुरस्कर्ता व आपल्या आईला टाकण्याविषयी सल्ला देणारा या दोन गोष्टींबद्दल मेरीने याच्यावर सूड उगविण्याचें ठरवून त्याला जिवंत जाळण्याची शिक्षा दिली.

**३२ एलिझबेथ् ( १५५८–१६०३ ) च्या कारकीर्दीतील ठळक गोष्टी सांगाः—**

(१) ॲक्ट ऑफ सुप्रिमसी व युनिफार्मिटी.

(२) स्कॉटलंडमधून फ्रेंच वर्चस्वाचें उच्चाटन.

(३) काउंटर रेफर्मेशन (प्रतिसुधारणा.)

(४) नेदरलंडमधील युद्ध.

(५) आरमेडाचा पराभव.

(६) दर्यावरील सफरी. इंग्लंडच्या आरमारी शक्तीची वाढ.

**३३ " ॲक्ट ऑफ् सुप्रिमसी " व " ॲक्ट ऑफ् युनिफॉर्मिटी " म्हणजे काय?**—एलिझबेथ गादीवर आल्यावर पार्लमेंटनें हे कायदे १५५९ साली पास केले. पहिल्या कायद्याअन्वयें एलिझबेथनें पोपची सत्ता झुगारून देऊन इंग्लंडचे राजकर्तेच धार्मिक बाबतींत इंग्लंडचे श्रेष्ठ अधिकारी होत असें तिनें जाहीर केलें. व दुसऱ्या कायद्यान्वयें सहाव्या एडवर्डच्या कारकीर्दींत तयार केलेलें " साधारण प्रार्थनेचें पुस्तक " कांहीं किरकोळ बदल करून सर्व चर्चमध्ये चालू केलें.

**३४ एलिझबेथ्च्या कारकीर्दींतील स्कॉटलंडची माहिती द्याः**—स्कॉटलंडच्या गादीवरील राणी मेरी ही अल्पवयी असल्यामुळें सर्व राज्यकारभार तिची आई " मेरी ऑफ् गाइझ् " ही पहात असे. ती कॅथोलिक असून मेरीचेंही लग्न कॅथोलिक पंथीय फ्रेंच राजपुत्राशीं झालें होतें. त्यामुळे फ्रेंच वर्चस्व स्कॉटलंडमध्यें बरेंच होतें. तें लोकांना न आवडून त्यांनी **जॉन् नॉक्स** याच्या नेतृत्वा-

दि कॉंग्रेगेशन् " ही संस्था स्थापन झाली होती. त्याचा निश्चयीपणा, कर्तबगारी व स्वार्थत्यागतत्परता या गुणाबद्दल तो विशेष प्रख्यात आहे. स्कॉटलंडमधील धार्मिक कारभार त्याच्याच धोरणानें चालत असे. बालराजा जेम्स याला याच्याच शिक्षेत ठेविले होतें.

**२८ काउंटर् रेफॉर्मेशन अथवा सुधारणा प्रतिकार म्हणजे काय:**—कॅथोलिक धर्मालयांतील धर्मभ्रष्टतेमुळेंच प्रॉटेस्टंट पंथाची भरभराट झाली होती. तेव्हां जर प्रॉटेस्टंट पक्षाचा मोड करणे असेल तर कॅथोलिक पंथांत सुधारणा करणें आवश्यक होतें. व त्या उद्देशानें ट्रेंट येथें एक धर्मपरिषद भरून कॅथोलिक पंथाच्या पुनरुज्जीवनाचें कार्य झपाट्याने सुरु झालें. सुधारणेविरुद्ध या सुरु केलेल्या चळवळीस " काउंटर रेफॉर्मेशन " असे नाव आहे

त्यामुळें याला "रुधिरप्रिय कचेरी" ( Bloody Court of Inquisition ) हें नामाभिधान प्राप्त झालें.

**४१ इग्नेशिअस् लायोला विषयीं तुम्हांस काय माहिती आहे?**—हा एक स्पॅनिश सरदार असून लढाईंत जखमी झाल्यामुळें त्यानें लष्करी नोकरी सोडली होती. यानें १५४० मध्यें "सोसायटी ऑफ् जीझस्" ही संस्था स्थापन केली व त्या संस्थेचा तो पहिला सेनापती होता. त्यानें आपलें सर्व आयुष्य कॅथोलिक पथाच्या पुनरुज्जीवनासाच वाहिलें.

**४२ स्पेन विरुद्ध डच लोकांनीं केलेल्या बंडाची संक्षिप्त माहिती द्याः**—स्पेनच्या धार्मिक जुलमाचा प्रतिकार करण्याकरितां पहिल्यानें हॉलंडच्या लोकांनीं स्पेनविरुद्ध बंड उभारलें. तेव्हां फिलिपनें आपला सेनापती ड्यूक ऑफ् ऑल्व्हा याची बंड मोडण्याच्या कामीं नेमणूक केली. डच लोकांनीं वुइलियमच्या नेतृत्वाखालीं नेटानें युद्ध चालविलें व गनिमी काव्यानें लढून समुद्रावर विजय मिळविला. नंतर अलेक्झांडर ऑफ् पार्मा नांवाचा, कुशल सेनापती व चाणाक्ष मुत्सद्दी ह्मणून नांवाजलेल्या सरदारास फिलिपनें पाठविलें. यावेळीं एलिझबेथनें "अर्ल ऑफ् लिस्टर" याच्या हाताखालीं थोडीशी कुमक पाठविली. १५८४ सालीं वुइल्यमचा खून झाला व मोठा आणीबाणीचा प्रसंग आला. पण याचवेळीं फिलिपनें इंग्लंडवर स्वारी करण्याचा बेत केला व हॉलंडचें मरण टळलें.

**४३ "मौनी वुइल्यम्" व सर फिलिप सिडने यांची थोडक्यांत माहिती सांगाः**—नेदर्लंडच्या बंडांत हे दोन पुरुष प्रख्यातीस आले. यापैकीं पहिला हॉलंडचा नेता होता. त्याला एक गुप्त मसलत कळली असतानासुद्धां त्याजविषयीं कांहीं एक न बोलण्याची जी त्यानें सावधगिरी राखली तिजवरून त्याला **"मौनी"**

( "Silent" ) हें नांव पडलें. तो मोठासा राजकारणी नव्हता पण मनाचा खंबीर व संकटास न जुमानणारा होता.

सर फिलिप सिड्ने याची त्याच्या काळच्या थोर लोकांत गणना करावयास पाहिजे. तो विद्वान असून त्यानें "आर्केडिया" नांवाचें पुस्तक लिहिलें आहे. त्याला खिस्ती जीविताचा आदर्श असें मानण्यांत येई. तो झट्फेनच्या लढाईंत मारला गेला. तहान लागली असतांनासुद्धां तोंडाला लावलेला पाण्याचा लोटा जवळच पडलेल्या तहानेलेल्या शिपायास देण्याचें जें औदार्य त्यानें दाखविलें त्याबद्दल त्याची प्रख्याती आहे.

**४४ स्पेनच्या दुसऱ्या फिलिपचें चरित्र लिहाः**—एलिझाबेथन काळांत जीं युरोपामध्यें अत्यंत प्रबळ राष्ट्रें होतीं त्यांत स्पेनची गणना होते त्यावेळी स्पेनच्या गादीवर दुसरा फिलिप या नांवाचा एक कर्तृत्ववान राजा राज्य करीत होता. हॉलंड, पोर्टुगाल, पेरू व मेक्सिको एवढे प्रदेश त्याच्या सत्तेखालीं होते. तो रोमन कॅथोलिक पंथाचा कट्टा पुरस्कर्ता असून प्रॉटेस्टंट पंथाचा नायनाट करण्याचा त्यानें चंग बांधला होता. पण त्याच्याविरुद्ध हॉलंडात बंड होऊन इंग्लंडावरच्या स्वारींत त्याला नागवेच अपयश आलें.

**४५ "स्पेनची इंग्लंडवर स्वारी" व "स्पेनचें अजिंक्य आरमार" यांची संक्षिप्त माहिती द्याः—**

(अ) युद्धाचीं कारणें:—

(१) दुसरा फिलीप हा महत्वाकांक्षी असून सर्व युरोपखंड पुन्हा कॅथोलिक करण्याचा त्यानें विडा उचलला होता. इंग्लंड हें त्या वेळीं प्रबळ असें प्रॉटेस्टंट राष्ट्र होतें. म्हणून दोन पंथांच्या या दोन पुरस्कर्त्यांमध्यें अर्थातच चुरस लागली होती.

( २ ) एलिझाबेथने डच लोकांना स्पेनविरुद्ध बंड करण्यांत मदत केली होती.

( ३ ) एलिझबेथनें फिलिपशीं लग्न करण्याच नाकारलें होतें.

( ४ ) स्पेनच्या राजाची मैत्रीण व कॅथोलिकपंथाची अनुयायी मेरी क्वीन् ऑफ स्कॉटस् हिचा वध.

( ५ ) इंग्लंडमधील खलाशांनी स्पॅनिश जहाजें लुटून त्यांच्या आरमाराची फार नासाडी केली होती. इत्यादि.

या कारणांमुळे इग्लंड व स्पेन यांमध्ये वैर धुमसत होते. ह्मणून स्पेनच्या राजानें एक मोठें आरमार तयार केलें व इंग्लंडवर स्वारी केली. हे आरमार फारच मोठें व बलाढ्य असून वर सैन्यही पुष्कळ होते ह्मणून फिलिपनें त्याला ( Invincible Armada ) "अजिंक्य आरमार" असे नाव दिले.

( ब ) **स्वारीची हकीकत.**—या अजिंक्य आरमारांत मोठालीं १३० जहाजें असून त्यात २०००० शिपाई होते. १५८८ सालीं जुलैच्या २९ व्या तारखेस तें आरमार कॉर्नवाल परगण्याच्या किनाऱ्या जवळ दिसू लागलें. त्याचवेळीं 'ड्यूक ऑफ् पार्मा' नावाचा स्पेनचा प्रख्यात सेनापति हॉलंडमध्ये मोठ्या सैन्यानिशीं असून त्याच्या नेतृत्वाखालीं ही स्वारी होणार होती. पण आरमाराचा मुख्य अधिकारी "सान्टाक्रूझ" हा कर्तृत्ववान् ॲडमिरल् मरण पावला व त्याच्या मागून नेमलेला अधिकारी "ड्यूक ऑफ् मेडिना सिडोनिया" हा या धाडसी कामास नालायक होता. इंग्लिश खलाशांनीं आपल्या लहान होड्यांतून आरमारावर चोहोंकडून हल्ला चढविला. स्पॅनिश जहाजें फारच बोजड असून त्यावर हुशार खलाशी कमी होते. समुद्रही त्यांच्या परिचयाचा नव्हता. त्यामुळे आरमाराचा फार नाश झाला. उरलेल्या जहाजांनीं कॅले या ठिकाणीं ठाणें दिलें. पण रात्रीच्या वेळीं इंग्लिश

खलाशानीं काहीं पेटलेलीं जहाजे त्या आरमारामध्ये पाठवून दिलीं. त्यामुळें त्यात बराच गोंधळ उडून त्यावरील खलाशी वाट मिळेल तिकडे जहाजें हाकारूं लागले. मग इंग्लिश खलाशांना त्याचा खरपूस समाचार घेतला. त्याचवेळीं मोठें वादळ उत्पन्न होऊन त्यात पुष्कळ जहाजांचा नाश झाला व फारच थोडीं जहाजें स्पेनला सुखरूप परत आलीं.

(क) इंग्लंडचा विजय होण्याचीं कारणें —

(१) स्पॅनिश जहाजांत हुशार नावाड्यांपेक्षा शूर सैनिकांचीच (म्हणजे समुद्रावर नालायक लोकांचीच) गर्दी होती.

(२) स्पॅनिश आरमारी अधिकारी अगदीच कुचकामाचा होता.

(३) स्पॅनिश जहाजें अवजड होतीं व इंग्लंडचीं जहाजें सुटसुटीत होतीं. त्यांना अनुक्रमें अवजड मोंगल सैन्य व सुटसुटीत मावळा सैन्य याची उपमा देता येईल.

(४) इंग्लिश खलाशी वसलेले हुशार नावाडी होते. लॉर्ड हॉवर्ड सारखा नेता त्यांना लाभला होता. ते स्वदेश रक्षणासाठीं प्राणावर उदार झाल्ले व परकीय सत्ता आणि कॅथोलिक पंथ यांचे द्वेष्टे होते. (त्यांपैकीं मुख्य —फ्रॉबिशर, गिल्बर्ट, ड्रेक, हॉकिन्स, लॉर्ड हॉवर्ड, सर वाल्टर रॅले हे होत.)

(ड) या युद्धाचे परिणाम —स्पेनसारख्या बलाढ्य राष्ट्राच्या अजिंक्य आरमाराचा पराभव केल्यामुळें इंग्लंडचें महत्त्व वाढलें व त्या वेळेपासून इंग्लंडचीं आरमारी शक्ति वाढत जाऊन लवकरच इंग्लंड हें पहिल्या प्रतीचें दर्यावर्दी राष्ट्र बनलें.

**४६ ट्यूडर कालांत इंग्रज नावाड्यांविषयीं तुम्हास काय माहिती आहे?**

नावाडी —(१) मार्टिन फ्रॉबिशर, (२) जॉन् डेविस, (३)

जान् हाकिन्स, (४) सर फ्रान्सिस ड्रेक, (५) सर हम्फ्रे गिल्बर्ट, (६) सर वॉल्टर रॅले.

सोळाव्या शतकाच्या आरंभीं नवीन भूप्रदेशाचा शोध लागला असल्यामुळें दर्यावरील सफरींना चालना मिळाली होती पण एलिझाबेथच्या कारकीर्दीतच इंग्लिश नावाड्यांना या जलपर्यटनामध्यें प्रामुख्यानें भाग घेतला त्यांनीं पुष्कळ सफरी केल्या व अपार संपत्ती घरीं आणली स्पेनचीं जहाज लुटलीं व स्पॅनिश आरमाराचा फारच नाश केला या सफरींच्या योगानं इंग्लंडमध्यें हुशार नावाड्यांची संख्या फारच वाढली व पुढें स्पेनच्या अजिंक्य आरमाराचा फडशा पाडण्याचं त्यांनीं महत्कार्य केलें. या दर्यावर्दी लोकांत वर निर्दिष्ट केलेले नावाडी प्रमुख होते. यांच्या चाचेगिरीमुळे हे लोक Sea dogs "दर्यावरील कुत्रे" या नांवानें प्रख्यात आहेत

१५७६–७८ च्या दरम्यान मार्टिन फ्रॉबिशर व १५८५–८७ च्या दरम्यान जॉन डेव्हिस् हे धाडसी नावाडी अमेरिकेच्या अगदीं उत्तरेकडून पूर्वेच्या बाजूस "वायव्य" मार्ग काढून काढ प्यास गुंतले होते पण त्यांना कॅनडापक्षां जास्त यश आलें नाहीं

हॉकिन्स हा प्रख्यात दर्यावर्दी डेव्हनशयर परगण्यातील गरीब नाशीं होता यानें गुलामाचा व्यापार मोठ्या प्रमाणावर केला व त्या बाबत पुष्कळ सफरी केल्या तिसऱ्या सफरीच्या वेळीं तो वसाहत असता स्पॅनिश आरमारावराल अधिकाऱ्यानें तहाची अट मोडून हल्ला केल्यामुळें याला पुष्कळ नुकसान सोसून परत यावें लागलें नंतर त्याला आरमार खात्याचा मुख्य खजिनदार नेमण्यांत आलें व त्यानें आरमारांत पुष्कळ उपयुक्त सुधारणा केल्या

ड्रेक हा धाडशी दर्यावर्दी असून हॉकिन्सच्या तालमेंत तयार झाला होता. १५७२ मध्यें स्पेनच्या अमेरिकेंतील वसाहतींवर त्यानें

हल्ला केला व पुष्कळ लूट मिळविली. या सफरीच्या वेळीं त्यानें पासिफिक महासागर पाहिला व त्या अज्ञात महासागरावर आपण सफर करावी अशी त्यास इच्छा उत्पन्न झाली. १५७७ मध्यें तो पुन्हा प्रवासास निघाला व यावेळीं पृथ्वी प्रदक्षिणा करून १५८० मध्यें स्वदेशीं परत आला.

**सर हंफ्रे गिल्बर्ट** यानें १५८३ सालीं न्यू फाउंडलंड बेटांत एक वसाहत स्थापण्याचा प्रयत्न केला. पण परत येत असता वाटेत मोठे वादळ झालें व त्यांत त्याचें जहाज बुडालें. बुडतांना त्याच्या हातांत बायबल होते असें ह्मणतात.

**सर वाल्टर राले**:—सर वॉल्टर राले हा एलिझबेथच्या कारकीर्दीतील प्रख्यात लढवय्या व दर्यावर्दी उमराव असून त्याच्यावर एलिझबेथची वहाल मर्जी होती त्यानें अमेरिकेंत व्हर्जीनिया नांवाची एक वसाहत स्थापण्याचा यत्न केला. पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. परंतु परत यताना त्यानें आपल्या बरोबर तंबाखू व बटाटे या जिनसा आणिल्या. स्पेनचीं जहाजें बुडविण्यांत यानें बराच भाग घेतला होता; त्यामुळें स्पेनचा राजा त्याचा द्वेष करी. पहिला जेम्स गादीवर आल्यावर त्यानें रालेवर राजद्रोहाचा आरोप ठेवून त्याला तुरुंगांत टाकिलें. कारण जेम्सला स्पेनच्या राजाला खुष करावयाचें होतें. रॅले तुरुंगांत १३ वर्षें होता. तेवढ्या अवधींत त्यानें एक जगाचा इतिहास लिहिला यानंतर ग्वायना देशांतील सोन्याच्या खाणी शोधून काढण्याच्या अटीवर त्याची मुक्तता करण्यांत आली. पण त्यांत त्याला यश न येतां परत येतांना स्पॅनिश लोकांबरोबर लढाई करावी लागली. तेव्हां स्पेनच्या खुषीखातर जेम्सनें त्याचा शिरच्छेद करविला.

**४७ एलिझबेथ कालीन इंग्लंडच्या वैभवाची माहिती द्या:—** एलिझबेथची कारकीर्द हा एक इंग्लंडचा मोठेपणाचा काळ होय. या काळात इंग्लंडमध्यें राष्ट्रीय धर्मालयाची स्थापना झाली. गरीब लोकांची व्यवस्था नीट लागली. पुष्कळ धार्मिक व सामाजिक सुधारणा घडून आल्या. लोकामध्यें धाडसाचें वारं शिरलें व त्यांनीं अनेक सफरी करून अफाट संपत्ती स्वदेशीं परत आणिली. व्यापार व उद्योग धंदे यांची वाट झपाट्यानें झाली व व्यापाराकरिता कंपन्या स्थापन करण्यांत आल्या. वाङ्मयाचीही अभिवृद्धि झाली असून स्पेनसारख्या बलाढ्य राष्ट्राचा पराभव झाला व इंग्लंडचें आरमारी वर्चस्व प्रस्थापित झालें.

अशा रीतीनें एलिझबेथच्या अमदानींत इंग्लंडची सर्व बाजूनें उन्नति झाल्यामुळें तिच्या अमदानीस इग्लंडचे "सुवर्ण युग" असें ह्मणतात.

**४८ एलिझबेथचा स्वभाव, कामगिरी व महत्व यांबद्दल माहिती द्या:—** एलिझबेथला स्वत:चा थोडासा फाजील अभिमान असून, तिला छानछोकी व डामडौल करण्याची फार हौस असे. तिला खुशामतीही फार आवडत असे.

**४७ एलिझबेथ कालीन इंग्लंडच्या वैभवाची माहिती द्याः—** एलिझबेथची कारकीर्द हा एक इंग्लंडचा मोठेपणाचा काळ होय. या काळात इंग्लंडमध्यें राष्ट्रीय धर्मालयाची स्थापना झाली. गरीब लोकांची व्यवस्था नीट लागली. पुष्कळ धार्मिक व सामाजिक सुधारणा घडून आल्या. लोकांमध्यें धाडसाचें वारे शिरले व त्यांनी अनेक सफरी करून अफाट संपत्ती स्वदेशी परत आणिली. व्यापार व उद्योग धंदे यांची वाढ झपाट्यानें झाली व व्यापाराकरितां कंपन्या स्थापन करण्यात आल्या. वाङ्मयाचीही अभिवृद्धि झाली असून स्पेनसारख्या बलाढ्य राष्ट्राचा पराभव झाला व इंग्लंडचे आरमारी वर्चस्व प्रस्थापित झाले.

अशा रीतीनें एलिझबेथच्या अमदानींत इंग्लंडची सर्व बाजूने उन्नति झाल्यामुळें तिच्या अमदानीस इंग्लंडचे "सुवर्ण युग" असे ह्मणतात.

**४८ एलिझबेथचा स्वभाव, कामगिरी व महत्व यांबद्दल माहिती द्याः—**एलिझबेथला स्वत:चा थोडासा फाजील अभिमान असून, तिला छानछोकी व डामडौल करण्याची फार हौस असे. तिला खुशामतीही फार आवडत असे

परंतु हे दोष क्षम्य होत. कारण इंग्लंडच्या गादीवर जे अत्यंत विख्यात राज्यकर्ते होऊन गेले त्यात एलिझबेथची गणना होते. तिनें स्पेनसारख्या राष्ट्राशीं यशस्वी रीतीनें टक्कर देऊन, इंग्लंडला एका मोठ्या आणीबाणीच्या संकटातून निभावून नेलें. तिच्या कारकीर्दीला "सुवर्ण युग" असें ह्मणतात ही एकच गोष्ट तिच्या योग्यतेची साक्ष पटविण्यास पुरेशी आहे. ती फार लोकप्रिय राणी असल्यामुळें तिला "Good Queen Bess" असेंही इतिहासात ह्मटलें जातें; ती स्वत:च ह्मणते "माझ्या रयतेचें हित

ज्यांत नव्हतें असा कोणताही विचार माझे मनांत कधी आला नाहीं."
"Nothing," she said, "Nothing is so dear to me as the love and goodwill of my people "

**४९ टयूडर राजे व पार्लमेंट यांचे परस्पर संबंध काय होते ते सांगून टयूडर राजांना अनियंत्रित राजसत्ता कशी प्राप्त झाली ते सांगा:**—टयूडर राजे गादीवर येण्यापूर्वीचे पार्लमेंटनें पुष्कळ राजांच्या दुर्बळतेचा फायदा घेऊन अनेक हक्क संपादन करून आपली सत्ता हळु हळु वाढविली होती. या हक्कांत पार्लमेंटच्या संमतीशिवाय राजानें कोणताही कायदा करूं नये व कोणताही कर वसूल करूं नये हे हक्क प्रमुख होते. टयूडर राजांच्या कारकीर्दीत नवीन हक्क मिळविण्याचें बाजूलाच राहिलें, पण या जुन्या हक्कांची अंमलबजावणीच नीट रीतीनें झाली नाहीं. हे सर्व हक्क तत्वतः मान्य होतें. पण प्रत्यक्ष व्यवहारांत टयूडरांनीं त्यांना धाब्यावर बसविलें होते. त्याचे पैसे मिळविण्याचे अनेक मार्ग होते. पैशाकरितां पार्लमेंटच्या तोंडाकडे बघण्याची त्यांना पाळी येत नसे व नवीन कायदा करतां येत नसला तरी ते जे जाहीरनामे काढीत त्यांना कायद्याचा मान असे. म्हणूनच टयूडरांच्या कारकीर्दीत "प्रजास्वातंत्र्याचे प्रयत्न लांबणीवर पडले" (During the Tudor Period the struggle for libert wasy post-poned) असें म्हटलें जातें.

टयूडर घराणें गादीवर येण्यापूर्वी अंतस्थ कलहामुळें बरीच अंदाधुंदी माजली होती. तेव्हां ती मोडण्यासाठीं कडक अमलाची जरूर होती व म्हणून लोकांनीं टयूडरांच्या हातीं सर्व अधिकार सोंपविले.

हा वेळपर्यंत बॅरन लोकांचें प्रस्थ इंग्लंडमध्यें फारच माजलें होतें. व राजसत्तेवर बॅरनांचा फार वचक असे. पण गुलाबांच्या युद्धांत यांनीत बरेच प्रबळ उमराव मारले गेले व जे उरले होते

त्यांचा सातव्या हेनरीनें फारच कडक रीतीनें बंदोबस्त केला. त्यामुळें राजसत्तेवरचा उमरावाचा दाब नाहींसा झाला. ट्यूडर राजानीं अधिकाराच्या जागेवर मध्यम वर्गांतीलच लोक नेमण्याचें धोरण आंखलें व हे नवीन लोक राजकृपेनेंच उत्कर्ष पावले असल्यामुळें, त्याचा राजांवर वचक असणें अशक्य होतें. अशा रीतीनें ट्यूडर राजांना अनियंत्रित सत्ता प्राप्त झाली व म्हणून त्यांच्या कारकीर्दीस 'जरबेची कारकीर्द' असें म्हणतात.

अशा रीतीनें ट्यूडर अमलांतील कारभार जरी अनियंत्रित होता तरी तो कौंसिलच्या सल्ल्यानेंच चालत असे. ते जरी अनियंत्रितपणें वागत असत तरी राष्ट्रमत पाहून व पार्लमेंटची अनुमती घेऊन मगच वर्तन करीत; इतर जुलमी राजांप्रमाणें लोकांच्या इच्छेविरुद्ध तलवारीच्या धारेनें राज्य हांकीत नव्हते. मिळालेल्या सत्तेचा उपयोग ते लोकांच्या कल्याणासाठीं व राष्ट्र कार्यक्षम करण्यासाठीं करीत असल्यामुळें त्यांना लोकांनीं विरोध केला नाहीं. त्यांनीं ज्या सुधारणा घडवून आणल्या त्या लोकांच्या इच्छेविरुद्ध नसून इच्छेला अनुसरून होत्या. पार्लमेंट व राज्यकर्ते यांचीं कार्यक्षेत्रें निरनिराळीं होतीं व ते एकमेकांच्या कार्यांत ढवळाढवळ करीत नसत. यांतच ट्यूडरांच्या यशाचें व लोकप्रियतेचें बीज आहे व हें धोरण न पाळल्यामुळेंच स्टुअर्ट घराणें अप्रिय झालें.

**५० ट्यूडर अमदानींतील स्कॉटलंड, वेल्स, आणि आयर्लंड यांची माहिती द्याः—** ट्यूडर राजे स्वतःच वेल्स कुळांतील असल्यामुळें त्या देशाचें व इंग्लंडचें कायमचें ऐक्य झालें व तें अजूनही निराबाधपणें टिकलें आहे.

स्कॉटलंड आणि इंग्लंड या देशांचें प्राचीन काळापासून वांकडें होतें व या दोन देशांचे एकमेकांत अनेक झगडे झाले होते.

या दोन देशांत स्नेहसंबंध घडवून आणण्याकरितां सातव्या हेनरीनें आपली मुलगी मार्गारेट हिचें स्कॉटलंडच्या चौथ्या जेम्सशीं लग्न लावून दिलें, पण त्यापासून कांहीं एक उपयोग न होतां आठव्या हेनरीच्या कारकीर्दींत या दोन देशांमध्यें युद्ध सुरू झालें व स्वतः जेम्स फ्लॉडेन्फील्डच्या लढाईंत मारला गेला.

१५४३ मध्यें स्कॉटलंडशीं तह होऊन त्यांत स्कॉटलंडची राजकन्या मेरी व इंग्लंडचा राजपुत्र एडवर्ड यांचा विवाह होण्याचें ठरलें. व त्यामुळें एकीचा रंग दिसूं लागला. पण ड्यूक ऑफ् सॉमरसेटच्या उतावीळपणामुळें तो हेतु साध्य झाला नाहीं. एलिझबेथच्या कारकीर्दींत स्कॉटलंडमध्यें पुष्कळ घडामोडी झाल्या व त्यांचें पर्यवसान मेरीला हांकलून देऊन जेम्सला गादीवर बसविण्यांत झालें. (प्रश्न ३४ पहा) एलिझबेथ मरण पावल्यावर तोच इंग्लंडच्या गादीवर आल्यामुळें हीं दोन राष्ट्रें एकाच राजछत्राखालीं आलीं.

ट्युडर कारकीर्दीला सुरवात झाली तेव्हां आयर्लंड फार मागसलेल्या स्थितींत होतें. आयर्लंड जरी इंग्लंडच्या राजाच्या वर्चस्वाखालीं आहे असे मानण्यांत येत होतें तरी "इंग्लिश पेल" अथवा "इंग्रजी आवार" या नांवानें प्रख्यात असलेल्या भागावरच काय ती इंग्लिशांची खरीखुरी सत्ता चालत होती. बाकीच्या प्रदेशावर आयरिश उमराव आपली सत्ता गाजवीत असत.

लॅंबर्ट सिमनेल व परकिन वॉरबेक यांना आयर्लंडमध्यें पाठबळ मिळाल्यामुळें, त्या देशापासून आपणाला धोका असल्याचें सातव्या हेनरीच्या ध्यानांत येऊन त्यानें तेथें व्यवस्था राखण्याचे कामीं सर एडवर्ड पॉयनिंगची नेमणूक केली. त्यानें आपलें काम चोख रीतीनें बजावून "पॉयनिंग्ज् लॉ" या नांवानें प्रख्यात असलेला कायदा पास करून घेतला; (प्रश्न ८ पहा) त्यानंतर आठव्या हेनरीच्या कारकीर्दीत

थॉमस् फिल्डेरचें बंड, एलिझबेथच्या कारकीर्दीत शेन ओनेलचें बंड, डेस्मॉडच्या अर्लचें बंड, अर्ल ऑफ टायरोनचें बंड वगैरे अनेक बंडें झालीं. पण त्या सर्वांचा कडक रीतीनें बंदोबस्त करण्यात आला व एलिझबेथच्या कारकीर्दीच्या शेवटीं सर्व आयर्लंडवर इंग्लिश सत्ता पूर्णपणें प्रस्थापित करण्यात आली.



**५२ पहिला जेम्स अप्रिय होण्याची कारणें सांगा:—**
(१) धर्म—जेम्सचें शिक्षण प्युरिटनसदृश लोकांच्या नजरेखालीं झालें असल्यामुळें, तो गादीवर येताच प्युरिटन लोकांना आनंद वाटला व त्यांना त्याजकडे प्युरिटन आचारविचार सर्वत्र सुरू करावे असा अर्ज केला जेम्सची आई मेरी ही कट्टी कॅथॉलिक असल्यामुळें जेम्सला त्या पंथाबद्दल सहानुभूति वाटेल अशी त्या पंथाच्या लोकांची *अटकळ होती व इंग्लंडच्या राष्ट्रीय धर्मपंथीय लोकांना (एपिस्को*पोलिअन) तो एलिझबेथचेंच धोरण पुढें चालवील असें वाटत होतें जेम्सनें या सर्वांचें म्हणणें ऐकून घेण्यासाठीं **हॅम्प्टन् कोर्ट येथें एक सभा भरविली.** व एलिझबेथचेंच धोरण आपण पुढें चालविणार असल्याचें त्यानें जाहीर केलें त्यामुळें प्युरिटन लोकांना त्याचा फार राग आला व पार्लमेंटांत याच पंथाचे लोकांचें वर्चस्व असल्यामुळें ते जेम्सच्या विरुद्ध झाले

**(२) जेम्सचीं राजाच्या हक्काविषयीं विचित्र मतें —** "राज्यकर्त्याची सत्ता व अधिकार ईश्वरदत्त असून राजाला राजपद वंशपरंपरा हक्कानें मिळत असतें राजा करील ती गोष्ट न्यायाचीच असते राजानें अमुक करावें व अमुक करूं नये असें म्हणण्याचा प्रजेला काहींच हक्क नाहीं" असें याचें म्हणणें होतें या तत्त्वानांच "**Divine Right of Kings**" किंवा "**राजाची दैवी सत्ता**" व "King's Prerogative म्हणजे "राजाचा विशेष सत्ता" असें नांव आहे

जेम्सनें पुष्कळ वेळां पार्लमेंट बोलाविलें पण प्रत्येक वेळीं त्यातील सभासदांच्या टाळेमुळें त्याचें पित्त खवळून त्यानें तें बरखास्त केलें व पार्लमेंट शिवायच राज्यकारभार करण्याचा प्रयत्न केला पण मुख्य अडचण पैशाची होती त्यानें त्याकरितां नानाप्रकारचे कर व जकाती बसविल्या पदव्यासुद्धां विकूं लागला पार्लमेंटनें त्याला "टनेज व

पैडेंज् " हा कर घेण्याची परवानगी दिली होती. पण त्याशिवाय त्यानें पुष्कळ बिगरकायदा जकाती बसविल्या; त्याला "इंटलन्स्" असें ह्मणतात. या गरकायदा जकातीवरून लवकरच भांडण जुंपलें. न्यायालयें व स्टार चेंबर कचेरी याचाहि त्यानें दुरुपयोग केला.

( ३ ) परराष्ट्रीय धोरण —त्याचें परराष्ट्रीय धोरण लोकांना चीड आणणारें होतें ( १ ) याच्या कारकीर्दींत जर्मनीमध्यें प्रॉटेस्टंट-पथीय व कॅथोलिकपथीय लोकांमध्यें " तीस वर्षांचें युद्ध " ( Thirty years' war ) या नावानें प्रख्यात असलेलें युद्ध झालें यांत प्रॉटेस्टंटाच्या बाजूनें जेम्सचा जावई पॅलेस्टाइनचा इलेक्टर लढत होता परंतु जेम्सनें त्याला मदत करण्यांत फारच दिरंगाई केली ( २ ) याचें कारण ह्मणजे जेम्सला कॅथॉलिकपथीय स्पेनला खुष ठेवून स्पेनिश राजकन्येचें आपला मुलगा चार्लस् याच्याशीं लग्न घडवून आणावयाचें होतें. पण स्पेनविषयीं इंग्लिश-लोकांना तिटकारा वाटत असून ते या लग्नाच्या विरुद्ध होते. शेवटीं तें लग्न फिसकटलें. पण ( ३ ) कॅथॉलिकपथीय असलेल्या फ्रान्सच्या राजकन्येशीं चार्लस्चा विवाह झाला.

५३ टिप्पणें लिहाः—( Write short notes on ):—
( १ ) पहिल्या जेम्सचा स्वभाव व धोरण ( २ ) राजाचा ईश्वरी हक्क व त्याची विशेषसत्ता ( Divine right of kings and king's Prerogative ) ( ३ ) गन पावडर प्लॉट् ( ४ ) लॉर्ड बकन ( ५ ) ड्यूक ऑफ बकिंगहॅम

( १ ) जेम्स हा स्वभावानें गर्विष्ठ असून मनानें हलका व मूर्ख होता केवळ पुस्तकी ज्ञान पाहिलें तर इंग्लंडातील सर्व राजांपेक्षा जेम्स हा अधिक विद्वान् होता पण त्याचबरोबर व्यवहारशून्यही होता. म्हणून इतिहासांत त्याचें " The wisest fool in Christendom '

असें वर्णन केलें आहे त्याच्या आपल्या अधिकाराविषयीं फाजील कल्पना असून त्यास त्याला पार्लमेंटची ढवळाढवळ खपत नसे व पार्लमेंटच्या सल्ल्याशिवाय त्यानें राज्य करण्याचें धोरण ठेविलें होतें. पण अंगीं कर्तृत्व शक्ति नसल्यामुळें ट्यूडर राजासारखें त्याला यश आलें नाहीं.

( २ ) प्रश्न ५२ पहा.

( ३ ) कॅथोलिकपंथीय लोकांना जेम्सविषयी पुष्कळ आशा वाटत होती (प्रश्न ५२ पहा) पण ती विफल झाल्यामुळें काहीं निधड्या कॅथोलिकांनीं " गन् पॉवडर प्लॉट " या नांवाचा एक कट रचला. पार्लमेंटगृहाच्या एका तळघरात दारू भरून तें गृह उडवून देण्याचा त्यानीं बेत केला. पण त्यात सामील असलेल्या एका गृहस्थानें आपल्या एका नातलगास धोक्याची आगाऊ इशारत देणारें एक पत्र लिहिलें. तें पत्र त्यानें राजापुढें सादर केलें. तावडतोब तळघराची तपासणी करण्यात आली व तेथेंच सापडलेल्या गाय् फॉक्स याला व त्याच्या इतर साथीदारास पकडून फाशी देण्यात आलें. हा कट कॅथोलिकपंथीय लोकांकडून रचण्यात आल्याचें उघडीस आल्यामुळें त्यांच्याविषयीं लोकांना तिटकारा येऊन त्यांच्या विरुद्ध कायद्याची अमलबजावणी कडक रीतीनें होऊं लागली.

राजाच्या मर्जीप्रमाणें न्याय देत असे. पार्लमेंटनें या गुन्ह्याबद्दल त्याची चौकशी केली व त्याला कामावरून दूर केलें.

(५) रॉबर्ट सेसिल हा कर्तृत्ववान् कारभारी निवर्तल्यावर जेम्सनें सर्व कारभार आपल्या कृपेतल्या लोकांच्या हातीं दिला. त्यात **जॉर्ज व्हिलियर्स ऊर्फ ड्यूक ऑफ् बकिंगहॅम्** हा मुख्य होता. हा मोहक, नटवेबाज व बुद्धिमान पण घातकी होता. जेम्सच्या व चार्ल्सच्या सर्व गैरकायदा गोष्टीत हाच त्याचा मुख्य सल्लागार होता. तेव्हां पार्लमेंटनें त्याला मंत्रिपदावरून काढून टाकण्याबद्दल मागणी केली. चार्ल्सनें आपल्या मंत्र्यावर पार्लमेंटचा काहींएक अधिकार नाहीं असें बजाविलें. तरी न डगमगता पार्लमेंट त्याच्यावर खटला भरण्याच्या विचारांत होतें. पण इतक्यातच पोर्टस्मथ येथें एका लष्करी अमलदाराचे हातून तो मारला गेल्यामुळें तो प्रसंग टळला. तेव्हां पार्लमेंटची एक पीडा टळली असें वाटलें.

**५४ पहिल्या चार्ल्सची सिव्हिल वॉरपर्यंतची कारकीर्द** लिहाः—बकिंगहॅमच्या मृत्यूनंतर दुसऱ्या कोणासही आपला मंत्री न नेमता चार्ल्स् स्वतःच सर्व कारभार पाहूं लागला पण पैशासाठीं त्याला १६२८ मध्यें पार्लमेंट बोलवावें लागलें. तेव्हा या नवीन पार्लमेंटनें चार्ल्सच्या बेकायदेशीर कृत्याचा निषेध करून, पिम्, एलियट, हॅम्डन्, वेंटवर्थ वगैरे पुढाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं "पिटिशन ऑफ् राइट्स्" ऊर्फ "हक्कांचा अर्ज" (प्रश्न ५७ पहा) या नांवाच्या करारावर चार्ल्सला सही करण्यास भाग पाडलें पण चार्ल्स् त्याप्रमाणे न वागल्यामुळे पार्लमेंटनें त्याचा निषेध केला. तेव्हा चार्ल्सला संताप येऊन त्यानें ते पार्लमेंट बंद केलें व पार्लमेंटच्या मदतीशिवाय १२ वर्षे राज्यकारभार चालविला.व एलिअट, व्हॅलेन्टाईन वगैरे लोकांना कैदेंत टाकिलें. या अवधींत त्यानें पुष्कळ कर वसूल केले. त्यात "शिप-

**मनी "** ह्या करामुळे पुष्कळच खळबळ उडाली जॉन् हॅम्डन् यानें हा कर देण्याचें साफ नाकारलें. राजपक्षपाती न्यायाधिशानीं त्याची चौकशी करून त्याला जबर दंड ठोठावला. (१६३८) राजकीय बाबतींत लॉर्ड स्ट्रॅफर्ड व धार्मिक बाबतींत आर्चबिशप लॉड याच्या सल्ल्यानें त्यानें पुष्कळ बेकायदेशीर व जुलमी कृत्यें केलीं स्टारचेंबर व हायकमिशन कोर्टें (प्रश्न ५७ पहा) याचा दुरुपयोग केला लॉडने इग्लंडाय प्रार्थनेची पद्धत स्कॉटलंडमध्यें सुरू करण्याचा प्रयत्न केला. त्यामुळें तेथें बंड झालें तेव्हा त्याचा मोड करण्यासाठीं पैशाची जरूर लागून चार्ल्सनें १६४० साली पार्लमेंट बोलाविलें पार्लमेंटनें आपल्या गाऱ्हाण्याचा राजाकडून विचार झाल्याशिवाय पैसा मंजूर करण्याचें नाकारल्यावरून राजानें तें तात्काळ बरखास्त केलें हें पार्लमेंट फक्त तीनच आठवडे टिकल्यामुळे त्याला **"शॉर्ट पार्लमेंट"** असे नाव पडलें त्यानंतर ६ महिन्यांनी नवीन पार्लमेंट बोलाविण्यात आलें हे पार्लमेंट १९ वर्षे टिकलें म्हणून त्याला **"लॉंग पार्लमेंट"** असें नाव पडलें हे पार्लमेंट भरल्याबरोबर त्यानें राजाचे मुख्य सल्लागार स्ट्रॅफर्ड व लॉड याची चौकशी करून त्याना फाशीचा शिक्षा ठोठावली त्यानंतर स्टारचेंबर व हायकमिशन हीं कोर्टें रद्द केलीं येथपर्यंत ठीक झालें पण प्युरिटन पंथीय सभासदानीं धार्मिक सुधारणा करण्याचा विचार केल्याबरोबर पक्षभेद सुरू झाले तेव्हा ही संधी बरी आहे असे पाहून, चार्ल्स, बरोबर सैन्य घेऊन, पार्लमेंटरा पुढाऱ्याना पकडण्याकरिता सभागृहात शिरला पण जबरदस्तीमुळें गोष्ट निकरावर आली व लवकरच राजा व पार्लमेंट याच्यामध्ये युद्ध पुकारण्यात आलें या सर्व अनर्थाचें मूळ राजाचा अरेरावी हें होय.

५८ **सिव्हिलवॉरची संक्षिप्त हकीगत द्या** –हें आपमतलबी युद्ध **"सिव्हिल वॉर"** या नावाने प्रसिद्ध आहे बरेचसे सरदार व अमीर-

या दोन देशात स्नेहसंबंध घडवून आणण्याकरिता सातव्या हेनरीनें आपली मुलगी मार्गारेट हिचें स्कॉटलंडच्या चाथ्या जेम्सशीं लग्न लावून दिलें, पण त्यापासून काहीं एक उपयोग न होता आठव्या हेनरीच्या कारकीर्दीत या दोन देशामध्ये युद्ध सुरू झालें व स्वत जेम्स फ्लॉडेन्फिल्डच्या लढाईंत मारला गेला.

१५४३ मध्यें स्कॉटलंडशीं तह होऊन त्यात स्कॉटलंडची राजकन्या मेरी व इंग्लंडचा राजपुत्र एडवर्ड याचा विवाह होण्याचें ठरलें. व त्यामुळें एकीचा रंग दिसू लागला. पण ड्यूक ऑफ् सॉमरसेटच्या उतावीळपणामुळे तो हेतु साध्य झाला नाहीं. एलिझबेथच्या कारकीर्दीत स्कॉटलंडमध्यें पुष्कळ घडामोडी झाल्या व त्याचें पर्यवसान मेरीला हाकलून देऊन जेम्सला गादीवर बसविण्यात झालें. (प्रश्न ३४ पहा) एलिझबेथ मरण पावल्यावर तोच इंग्लंडच्या गादीवर आल्यामुळें हा दोन राष्ट्रें एकाच राजाखालीं आलीं.

ट्यूडर कारकीर्दीला सुरवात झाली तव्हा आयर्लंड फार मागसलेल्या स्थितींत होतें आयर्लंड जरी इंग्लंडच्या राजाच्या सर्वसत्ताखालीं आहे असें मानण्यात येत होतें तरी "इंग्लिश पेल" अथवा "इंग्रजी आवार" या नावानें प्रख्यात असलेल्या भागावरच काय ती इंग्लिशांची खराखुरी सत्ता चालत होती बाकीच्या प्रदेशावर आयरिश उमराव आपली सत्ता गाजवीत असत

लॅंबर्ट सिमनेल व परकिन वारबेक याना आयर्लंडमध्यें पाठबळ मिळाल्यामुळें, त्या देशापासून आपणास धोका असल्याचें सातव्या हेनरीच्या ध्यानात येऊन त्यानें तथें व्यवस्था राखण्याचे कामीं सर एडवर्ड पॉयनिंगची नेमणूक केली त्यानें अ पल काम चांगल्या रीतीनें बजावून "पॉयनिंग्ज् लॉ" या नावानें प्रख्यात असलेला कायदा पास करून घेतला, (प्रश्न ८ पहा) त्यानंतर आठव्या हेनरीच्या कारकीर्दीत

थॉमस् फिट्जेरल्डचें बंड, एलिझबेथच्या कारकीर्दींत शेन ओनेलचें बंड, डेस्मॉडच्या अर्लचें बंड, अर्ल ऑफ टायरोनचें बंड वगैरे अनेक बंडें झालीं. पण त्या सर्वांचा कडक रीतीनें बंदोबस्त करण्यांत आला व एलिझबेथच्या कारकीर्दीच्या शेवटीं सर्व आयर्लंडवर इंग्लिश सत्ता पूर्णपणें प्रस्थापित करण्यात आली.



**५२ पहिला जेम्स अप्रिय होण्याचीं कारणें सांगा:—**
(१) धर्म—जेम्सचें शिक्षण प्यूरिटनसदृश लोकांच्या नजरेखालीं झालें असल्यामुळें, तो गादीवर येताच प्यूरिटन लोकांना आनंद वाटला व त्यांनी त्याजकडे प्यूरिटन आचारविचार सर्वत्र सुरू करावे असा अर्ज केला. जेम्सची आई मेरी ही कट्टी कॅथोलिक असल्यामुळें जेम्सला त्या पंथाबद्दल सहानुभूति वाटेल अशी त्या पंथाच्या लोकांची अटकळ होती. व इंग्लंडच्या राष्ट्रीय धर्मपंथीय लोकांना (एपिस्कोपोलेअन) तो एलिझबेथचेंच धोरण पुढें चालवील असें वाटत होतें. जेम्सनें या सर्वांचें म्हणणें ऐकून घेण्यासाठीं **हॅम्प्टन् कोर्ट येथें एक सभा भरविली.** व एलिझबेथचेंच धोरण आपण पुढें चालविणार असल्याचें त्यानें जाहीर केलें त्यामुळें प्यूरिटन लोकांना त्याचा फार राग आला व पार्लमेंटात याच पंथीय लोकांचें बहुमत असल्यामुळें ते जेम्सच्या विरुद्ध झाले.

**(२) जेम्सचीं राजाच्या हक्काविषयीं विचित्र मतें:—** "राज्यकर्त्याची सत्ता व अधिकार ईश्वरदत्त असून राजाला राजपद वंशपरंपरा हक्कानें मिळत असतें. राजा करील ती गोष्ट न्यायाचीच असते. राजानें अमुक करावें व अमुक करूं नये असें म्हणण्याचा प्रजेला कांहींच हक्क नाहीं" असें याचें म्हणणें होतें. या तत्वानांच "**Divine Right of K ngs**" किंवा "**राजाची दैवी सत्ता**" व "King's Prerogative म्हणजे "राजाची विशेष सत्ता" असें नांव आहे

जेम्सनें पुष्कळ वेळा पार्लमेंट बोलाविलें. पण प्रत्येक वेळीं त्यांनीं त्या सभासदांच्या टीकेमुळें त्याचें पित्त भडकून त्यानें तें बरखास्त केलें. व पार्लमेंट शिवायच राज्यकारभार करण्याचा प्रयत्न केला. पण मुख्य अडचण पैशाची होती. त्यानें लोकांकरिता नानाप्रकारचे कर व जकाती बसविल्या. पदव्यासुद्धा विकूं लागला. पार्लमेंटनें त्याला " टनेज व

पैंडेज् " हा कर घेण्याची परवानगी दिली होती. पण त्याशिवाय त्यानें पुष्कळ बिगरकायदा जकाती बसविल्या; त्याला "इंडलजन्स्" असें ह्मणतात. या गैरकायदा वसुलीवरून लवकरच भांडण जुंपलें. न्यायालयें व स्टार चेंबर कचेरी याचाहि त्यानें दुरुपयोग केला.

( ३ ) परराष्टीय धोरण—त्याचें परराष्ट्रीय धोरण लोकांना चीड आणणारें होतें. ( १ ) याच्या कारकीर्दींत जर्मनीमध्यें प्रॉटेस्टंट-पंथीय व कॅथोलिकपंथीय लोकांमध्यें " तीस वर्षांचें युद्ध " ( Thirty years' war ) या नावानें प्रख्यात असलेलें युद्ध झालें. यात प्रॉटेस्टंटांच्या बाजूनें जेम्सचा जावई पॅलेस्टाइनचा इलेक्टर लढत होता. परंतु जेम्सनें त्याला मदत करण्यात फारच दिरंगाई केली. ( २ ) याचें कारण ह्मणजे जेम्सला कॅथोलिक पंथीय स्पेनला खुष ठेवून स्पॅनिश राजकन्येचें आपला मुलगा चार्ल्स याच्याशीं लग्न घडवून आणावयाचें होतें. पण स्पेनविषयीं इंग्लिश-लोकांना तिटकारा वाटत असून ते या लग्नाच्या विरुद्ध होते. शेवटीं तें लग्न फिसकटलें. पण ( ३ ) कॅथोलिकपंथीय असलेल्या फ्रान्सच्या राजकन्येशीं चार्ल्स्‌चा विवाह झाला.

**५२ टिप्पणें लिहाः**— ( Write short notes on ):—
( १ ) पाहिल्या जेम्सचा स्वभाव व धोरण ( २ ) राजाचे ईश्वरी हक्क व त्याची विशेषसत्ता. ( Divine right of kings and king's Prerogative ) ( ३ ) गन पांवडर प्लॉट् ( ४ ) लॉर्ड बेकन ( ५ ) डयूक ऑफ बकिंगहॅम.

( १ ) जेम्स हा स्वभावानें गर्विष्ठ असून मनानें हलका व मूर्ख होता. केवळ पुस्तकी ज्ञान पाहिलें तर इंग्लंडातील सर्व राजापेक्षा जेम्स हा अधिक विद्वान् होता पण त्याचबरोबर व्यवहारशून्यही होता. म्हणून इतिहासांत त्याचें " The wisest fool in Christendom "

राजाच्या मर्जीप्रमाणे न्याय देत असे. पार्लमेंटनें या गुन्ह्याबद्दल त्याची चौकशी केली व त्याला कामावरून दूर केलें.

(५) रॉबर्ट सेसिल हा कर्तृत्ववान् कारभारी निवर्तल्यावर जेम्सनें सर्व कारभार आपल्या कृपेतल्या लोकांच्या हातीं दिला. त्यांत **जॉर्ज व्हिलियर्स् उर्फ ड्यूक ऑफ् बकिंगहॅम्** हा मुख्य होता. हा मोहक, नटवेबाज व बुद्धिमान पण घातकी होता. जेम्सच्या व चार्ल्सच्या सर्व गैरकायदा गोष्टींत हाच त्याचा मुख्य मसलतगार होता. तेव्हां पार्लमेंटनें त्याला मंत्रिपदावरून काढून टाकण्याबद्दल मागणी केली. चार्ल्सनें आपल्या मंत्र्यावर पार्लमेंटचा कांहींएक अधिकार नाहीं असें बजाविलें. तरी न डगमगतां पार्लमेंट त्याच्यावर खटला भरण्याच्या विचारात होतें. पण इतक्यांतच पोर्टस्मथ येथें एका लष्करी अमलदाराचे हातून तो मारला गेल्यामुळें तो प्रसंग टळला. तेव्हां पार्लमेंटला एक पीडा टळली असें वाटलें.

**५४ पहिल्या चार्ल्सची सिव्हिल वॉरपर्यंतची कारकीर्द** लिहा:—बकिंगहॅमच्या मृत्यूनंतर दुसऱ्या कोणासही आपला मंत्री न नेमतां चार्ल्स स्वतःच सर्व कारभार पाहूं लागला. पण पैशासाठीं त्याला १६२८ मध्यें पार्लमेंट बोलवावें लागलें. तेव्हां या नवीन पार्लमेंटनें चार्ल्सच्या बेकायदेशीर कृत्याचा निषेध करून, पिम्, एलियट, हॅम्डन्, वेंटवर्थ वगैरे पुढाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं "**पिटिशन ऑफ् राइट्स्**" उर्फ "**हक्कांचा अर्ज**" (प्रश्न ५७ पहा) या नांवाच्या करारावर चार्ल्सला सही करणास भाग पाडलें पण चार्ल्स त्याप्रमाणें न वागल्यामुळें पार्लमेंटनें त्याचा निषेध केला. तेव्हां चार्ल्सला संताप येऊन त्यानें तें पार्लमेंट बंद केलें व पार्लमेंटच्या मदतीशिवाय १२ वर्षें राज्यकारभार चालविला.व एलिअट, व्हॅलेंटाईन वगैरे लोकांना कैदेंत टाकिलें. या अवधींत त्यानें पुष्कळ कर बसविले. त्यांत "शिप-

असे वर्णन केले आहे. त्याच्या आपल्या अधिकाराविषयी फाजील कल्पना असून त्यात त्याला पार्लमेंटची ढवळाढवळ खपत नसे व पार्लमेंटच्या सल्ल्याशिवाय त्यानें राज्य करण्याचे धोरण ठेविले होते. पण अंगीं कर्तृत्व-शक्ति नसल्यामुळे ट्यूडर राजांप्रमाणे त्याला यश आले नाहीं.

( २ ) प्रश्न ५२ पहा.

( ३ ) कॅथॉलिकपंथीय लोकांना जेम्सविषयी पुष्कळ आशा वाटत होती ( प्रश्न ५२ पहा ) पण ती विफल ठरल्यामुळें काहीं निधड्या कॅथोलिकांनीं " गन् पॉवडर प्लॉट " या नांवाचा एक कट रचला. पार्लमेंटगृहाच्या एका तळघरात दारू भरून तें गृह उडवून देण्याचा त्यांनीं बेत केला. पण त्यात सामील असलेल्या एका गृहस्थानें आपल्या एका नातलगाला धोक्याची आगाऊ इशारत देणारें एक पत्र लिहिलें. तें पत्र त्यानें राजापुढे सादर केले. तावडतोब तळघराची तपासणी करण्यात आली व तेथेच सापडलेल्या गाय् फॉक्स याला व त्याच्या इतर साथीदारांस पकडून फांशी देण्यात आलें. हा कट कॅथोलिकपंथीय लोकाकडून रचण्यात आल्याचें उघडीस आल्यामुळे त्यांच्याविषयीं लोकांना तिटकारा येऊन त्यांच्या विरुद्ध कायद्यांची अंमलबजावणी कडक रीतीनें होऊं लागली.

( ४ ) फ्रॅन्सिस बेकन हा पहिल्या जेम्सच्या कारकीर्दीत लॉर्ड चॅन्सेलर अथवा मुख्य न्यायाधीश होता. विद्वान या नात्यानें त्याची अजूनही प्रख्याति आहे. " Logic " व " Philosophy " म्हणजे " तर्कशास्त्र " व " तत्त्वज्ञान " या विषयांतील त्याच्या मतांचा अजूनही अभ्यास केला जातो. " अडव्हान्समेंट ऑफ् लर्निंग " म्हणजे विद्येची प्रगति, व " एसेज " म्हणजे निबंध हे त्याचे ग्रंथ विश्व-विद्यालयीन विद्यार्थ्यांच्या परिचयाचे आहेत. पण दुःखाची गोष्ट ही कीं त्याचे नैतिक बल फारच कमी प्रतीचें असून तो लाच घेत असे व

राजाच्या मर्जीप्रमाणें न्याय देत असे. पार्लमेंटनें या गुन्ह्याबद्दल त्याची चौकशी केली व त्याला कामावरून दूर केलें.

(५) रॉबर्ट सेसिल हा कर्तृत्ववान् कारभारी निवर्तल्यावर जेम्सनें सर्व कारभार आपल्या कृपेतल्या लोकांच्या हातीं दिला. त्यांत **जॉर्ज व्हिलियर्स् ऊर्फ ड्यूक ऑफ् बकिंगहॅम्** हा मुख्य होता. हा मोहक, नटवेगाज व बुद्धिमान पण घातकी होता. जेम्सच्या व चार्लस्च्या सर्व गैरकायदा गोष्टींत हाच त्याचा मुख्य सल्लागार होता. तेव्हां पार्लमेंटनें त्याला मंत्रिपदावरून काढून टाकण्याबद्दल मागणी केली. चार्लसनें आपल्या मंत्र्यावर पार्लमेंटचा कांहींएक अधिकार नाहीं असें बजाविलें. तरी न डगमगता पार्लमेंट त्याच्यावर खटला भरण्याच्या विचारांत होतें. पण इतक्यातच पोर्टस्मथ येथें एका लष्करी अमलदाराचे हातून तो मारला गेल्यामुळें तो प्रसंग टळला. तेव्हां पार्लमेंटला एक पीडा टळली असें वाटलें.

**५४ पहिल्या चार्लस्ची सिव्हिल वॉरपर्यंतची कारकीर्द लिहा:**—बकिंगहॅमच्या मृत्यूनंतर दुसऱ्या कोणासही आपला मंत्री न नेमता चार्लस् स्वतःच सर्व कारभार पाहूं लागला. पण पैशासाठीं त्याला १६२८ मध्ये पार्लमेंट बोलवावें लागलें. तेव्हा या नवीन पार्लमेंटनें चार्लसच्या बेकायदेशीर कृत्यांचा निषेध करून, पिम्, एलियट, हॅम्डन्, वेंटवर्थ वगैरे पुढाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं **"पिटिशन ऑफ् राइट्स्"** उर्फ **"हक्कांचा अर्ज"** (प्रश्न ५७ पहा) या नावाच्या कररावर चार्लसला सही करणाम भाग पाडलें पण चार्लस् त्याप्रमाणे न वागल्यामुळें पार्लमेंटनें त्याचा निषेध केला. तेव्हा चार्लसला संताप येऊन त्यानें तें पार्लमेंट बंद केलें व पार्लमेंटच्या मदतीशिवाय १२ वर्षें राज्यकारभार चालविला.व एलिअट, व्हॅलेनटाईन वगैरे लोकांना कैदेंत टाकिलें. या अवधींत त्यानें पुष्कळ कर बसविले. त्यांत "शिप-

**मनी"** ह्या करामुळें पुष्कळच खळबळ उडाली जॉन् हॅम्डन् यानें हा कर देण्याचें साफ नाकारलें. राजपक्षपाती न्यायाधिशानीं त्याची चौकशी करून त्याला जबर दंड ठोठावला. (१६३८) राजकीय बाबतींत लॉर्ड स्ट्रॅफर्ड व धार्मिक बाबतीत आर्चबिशप लॅाड याच्या सल्ल्यानें त्यानें पुष्कळ बेकायदेशीर व जुलमी कृत्यें केली स्टारचेंबर व हायकमिशन कोर्टें (प्रश्न ५७ पहा) याचा दुरुपयोग केला. लॉडनें इंग्लिश प्रार्थनेची पद्धत स्कॉटलंडमध्यें सुरू करण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे तेथें बंड झालें. तेव्हा त्याचा मोड करण्यासाठीं पैशाची जरूर लागून चार्ल्सनें १६४० साली पार्लमेंट बोलाविलें. पार्लमेंटनें लोकांच्या गाऱ्हाण्याचा राजाकडून विचार झाल्याशिवाय पैसा मंजूर करण्याचें नाकारल्यावरून राजानें तें तावडतोब बरखास्त केलें हें पार्लमेंट फक्त तीनच आठवडे टिकल्यामुळें त्याला **"शॉर्ट पार्लमेंट"** असें नाव पडलें त्यानंतर ६ महिन्यांनी नवीन पार्लमेंट बोलाविण्यात आलें. हे पार्लमेंट १२ वर्षे टिकलें ह्मणून त्याला **"लॉंग पार्लमेंट"** असे नाव पडले हे पार्लमेंट भरल्याबरोबर त्यानं राजाचे मुख्य सल्लागार स्ट्रॅफर्ड व लॅाड यांची चौकशी करून त्यांना फाशीची शिक्षा ठोठावली त्यानंतर स्टारचेंबर व हायकमिशन हीं कोर्टें रद्द केलीं येथपर्यंत ठीक झालें पण प्युरिटन पंथीय सभासदानीं धार्मिक सुधारणा करण्याचा विचार केल्याबरोबर पक्षभेद सुरू झाले. तेव्हा ही संधी बरी आहे असें पाहून, चार्ल्स, बरोबर सैन्य घेऊन, पार्लमेंटरी पुढाऱ्यांना पकडण्याकरितां सभागृहांत शिरला पण बबरदस्ती मुळे गोष्ट निकरावर आली व त्यावरून राजा व पार्लमेंट यांच्यामध्ये युद्ध सुरू करण्यांत आलें या सर्व अनर्थाचं मूळ राजाचा अविचार हेंच होय.

५५ **सिव्हिलवॉरची संक्षिप्त हकीकत द्या** –हे आपसातील युद्ध **"सिव्हिल वॉर"** या नावानें प्रसिद्ध आहे. बहुतेक सरदार व अमीर-

उमराव यांनीं राजाची बाजू घेतली होती ह्मणून त्यांना 'रायलिस्ट्स्' ऊर्फ शिलेदार व पार्लमेंटपक्षीय लोकांना "राउंडहेड्स" असें ह्मणतात. पार्लमेंटरी पक्षांत बरेचसे प्युरिटन आणि मध्यम वर्गांतले लोक होते. हें युद्ध ७ वर्षे टिकलें. पहिल्यानें राजपक्षाचा विजय झाला. राजफौजेचा सेनापती राजाचा भाचा प्रिन्स रूपर्ट हा असून त्यानें **शालग्रोव्ह-फील्ड** येथील लढाई जिंकली. या लढाईंत हॅमडन् हा मारला गेला; तेव्हां पिमनें स्कॉटलंडची मदत मागितली. याचवेळीं प्रख्यात सेनापती ऑलिव्हर क्रॉमवेल हा आपल्या नवीन तयार केलेल्या फौजेनिशीं पुढे सरसावला व त्यानें **मॉर्स्टन मूर** व **नेस्बी** या दोन लढायांत राजपक्षीयांचा पक्का बंदोबस्त केला. राजपक्षीय सेनापती **अर्ल ऑफ् मॉन्ट्रोज** याचा डेव्हिड् लेस्ली यानें पराभव केला व त्याला फाशीं देण्यांत आलें.

चार्लसनें स्कॉटिश लोकांना आपल्या बाजूला वळवून घेण्यासाठीं खटपट केली. पण ती न साधून त्यांनीं त्याला पार्लमेंटच्या स्वाधीन केलें. कॉमन्स् सभेपुढें त्याची चौकशी होऊन, "जुलुम, विश्वासघात व राजद्रोह" या आरोपाबद्दल त्याचा शिरच्छेद करण्यांत आला. ( १६४९ )

**५६ सिव्हिल वॉरनंतरच्या लोकसत्ताक राज्याचें वर्णन करा:**—चार्लसला फाशीं दिल्यानंतर इंग्लंडांत लोकसत्ताक राज्य स्थापन झाले असल्याचे जाहीर करण्यांत आलें व राजावांचून अकरा वर्षे राज्यकारभार हांकण्यात आला. आरंभीं पुष्कळच बखेडे झाले. आयर्लंडमध्यें बंडाळी सुरू होती. क्रॉमवेलनें या बंडाचा फारच कडक रीतीनें मोड केला. ड्रॉघेडा व वेक्सफर्ड हीं दोन शहरें फारच निर्दयपणें उध्वस्त करून आयर्लंडांत दहशत बसविली. त्यानंतर तो स्कॉटलंडकडे वळला. तेथील लोकांनीं राजपुत्र चार्लसला उचलून धरलें

होतें. क्रॉमवेल्नें डनबॉन् व वुस्टर येथें त्याचा पुरा मोड केला व चार्ल्स फ्रान्समध्यें पळून गेला. यानंतर क्रॉमवेल्नें परराष्ट्रीय राजकारणाकडे लक्ष दिलें. यावेळीं डच लोक दर्यावर्दीपणात पुढें होते. त्याचें आरमार चांगल्या प्रतीचें असून व्यापारात ते प्रमुख होते. त्यामुळें इंग्लंड व हॉलंड या देशामध्यें चुरस लागली होती. याच सुमारास ( १६५१ ) पास झालेला "नॅव्हिगेशन ॲक्ट" (प्रश्न ५७ पहा) तर डच लोकांना फारच जाचक झाला. परदेशी जहाजांनीं इंग्लिश खाडीमध्यें इंग्लिश जहाजास सलामी द्यावी असा क्रॉमवेल्नें आग्रह धरला. प्रकरण हातघाईवर येऊन युद्ध पुकारलें गेलें. आरंभीं डच आरमाराचा कुशल अधिकारी "व्हॅन् ट्रॉप्" यास जय मिळाला. पण लवकरच ॲडमिरल ब्लेकनें डच आरमाराचा पुरा मोड करून टाकला.

या सर्व अमदानींत पार्लमेंटचा अधिकार नांवालाच होता. वस्तुत सर्व सत्ता क्रॉमवेल्च्या हातात होती. त्याला लोकांनीं "लॉर्ड प्रोटेक्टर" नेमलें. त्यानें लष्करच्या जोरावर कडक बंदोबस्त ठेविला. त्यानें लोकसत्ताक पद्धति सुरू करण्याचे बरेच प्रयत्न केले. पण त्यात त्याला यश आलें नाहीं. क्रॉमवेल्कालीन लोकसत्ताक राज्य म्हणजे नुसता लष्करी अंमल होता. हा काल " प्युरिटन अंमल" या नावानेंही प्रख्यात आहे. कारण या वेळीं प्युरिटन लोकांचें प्राबल्य होतें. क्रॉमवेल १६५८ सालीं वारल्यावर त्याचा मुलगा रिचर्ड क्रॉमवेल याला संरक्षक नेमण्यात आलें. पण तो या जोखमीच्या कामाला नालायक होता. लष्करी सेनापती जनरल लँबर्ट व जनरल मंक यांच्यामध्यें भांडणें झालीं. व जनरल मंकच्या सल्ल्यानें, तापुर्त्या भरलेल्या नवीन पार्लमेंटनें चार्ल्सला पाचारण केलें. (१६६०) अशा रीतीनें स्टुअर्ट घराणें पुन्हां गादीवर प्रस्थापित झालें. या गोष्टीला "रेस्टोरेशन" म्हणतात.

५७ टिपणे लिहा ( Write short notes on )—(१) **पिटिशन ऑफ् राइट्स्** (२) हाय कमिशन कोर्ट (३) शिपमनी कर (४) स्कॉच कॉव्हेनंटर्स (५) शॉर्ट पार्लमेंट (६) लाँग पार्लमेंट (७) ग्रँड् रेमान्स्ट्रन्स (८) सॉलेम लीग अँन्ड कॉव्हेनंट (९) आयर्न साइड्स् (१०) नॅव्हिगेशन ॲक्ट (११) प्राइड्स् पर्ज (१२) इंचलोकांशीं युद्ध (१३) रंप पार्लमेंट (१४) बेअर बोन पार्लमेंट (१५) कन्व्हेनशन पार्लमेंट (१६) ब्रेडाचा जाहीरनामा (१७) रेस्टोरेशन. (१८) पिल्ग्रिम फादर्स (१९) थरो पॉलिसी (२०) इन्स्ट्रुमेंट ऑफ् गव्हर्नमेंट—

(१) १६२८ च्या पार्लमेंटनें चार्लसच्या बेकायदेशीर कृत्यांचा निषेध करून, पिम्, एलियट आणि वेंटवर्थ वगैरे पुढाऱ्यांच्या प्रेरणेनें "**पिटिशन ऑफ राइट्स्**" या नावाचा एक करारनामा तयार केला व तो मान्य करण्यास राजाला भाग पाडलें. त्यांत खालील गोष्टी नमूद केल्या होत्या.—(१) राजानें लोकांकडून सक्तीनें कर किंवा कर्ज वसूल करू नये. (२) कोणत्याही माणसाला आरोपाशिवाय तुरुंगांत टाकू नये. (३) लष्करी शिपाई वाढवून त्याचा खर्च देण्यास लोकांस भाग पाडू नये.व (४) शांततेच्या वेळीं लष्करी कायदा अमलांत आणूं नये.

(२) राजकीय बाबतींत राजाविरुद्ध वागणाराची चौकशी करण्याकरितां जसें **स्टारचेंबर** कोर्ट स्थापन झालें होतें त्याचप्रमाणें धार्मिक बाबतींत राजाची आज्ञा उल्लंघिणाराची चौकशी करण्याकरितां या **हायकमिशन कोर्टाची** स्थापना करण्यांत आली होती. स्ट्रॅफर्ड व लॉड यानीं या कोर्टाचा दुरुपयोग केल्यामुळें लॉंग् पार्लमेंटनें तें कोर्ट बरखास्त केलें.

(३) चार्लसनें ज्या कांहीं बेकायदेशीर गोष्टी केल्या, त्यांपैकीं "**शिप्मनी**" नांवाचा कर बसविणें ही प्रमुख होय. प्राचीन

काळीं ल्ढाईचे वेळीं आरमाराच्या खर्चाकरिता समुद्राकाठच्या गावाकडून "**शिप्मनी**" उर्फ "जहाजपट्टी" या नावाचा कर घेण्यात येत असे. शांततेचा काल असूनही, नुसत्या बंदराकाठच्या गावाकडूनच नव्हे, तर देशातील सर्व लोकाकडून हा कर घेण्यात यावा असें चार्लसनें फर्माविलें. **हॅम्डननें** हा कर देण्याचें नाकारलें व त्याबद्दल त्याला शिक्षा झाली.

( ४ ) आर्चबिशप **लॉड** यानें स्कॉटलंडात प्रेसबिटेरियन पंथाऐवजीं एपिस्कोपेलियन पंथ स्थापण्याचा उपक्रम केल्यामुळे स्कॉटिश लोकाना चीड येऊन चार्लसचा प्रतिकार करण्याकरिता त्यानीं एक संघ स्थापन केला व एकमेकाना मदत करण्याचा आपआपसात करार केला. या कराराला "**नॅशनल कॉव्हेनंट**" व या लोकाना "**कॉव्हेनंटर्स**" असे ह्मणतात.

( ५ ) **शॉर्ट पार्लमेंट** ( प्रश्न ५४ पहा )

( ६ ) **लॉंग पार्लमेंट** ( ५४ पहा ) हें १६४० साली भरून विसर्जन पावलें. ह्या पार्लमेंटची हकीकत ह्मणजे सिव्हिल वॉरनंतरचें प्रजासत्ताक राज्य व त्यानंतरचें क्रॉमवेलचें प्रोटेक्टोरेट याचाच इतिहास होय. त्याकरिता प्रश्न ५४–५५–५६ पहा.

( ६ ) **ग्रँड रेमॉन्स्ट्रन्स** हा खलिता लॉंग पार्लमेंटनें १६४१ सालीं तयार केला. यातील पहिल्या भागात चार्लसच्या बेकायदेशीर कृत्याचा व पार्लमेंटनें योजिलेल्या तत्प्रतिबंधक उपायाचा उल्लेख होता. हा भाग बिनहरकत पास झाला, पण पुढील भागात धार्मिक प्रश्न असल्यामुळें त्यावर रणें माजलीं.

( ८ ) सिव्हिल वॉर सुरू झाल्यावर आरंभीं जिकडे तिकडे राजपक्षाचीच सरशी झाली. हें पाहून पिम्नें स्कॉटिश लोकाजवळ एक

करार करून त्याची मदत मागितली. "स्कॉटलंडांतील उपासनेचा विधि इंग्लंडात सुरू करावा व त्याचा मोबदला ह्मणून स्कॉटिश सैन्यानें पार्लमेंटला मदत करावी " असा त्या कराराचा आशय होता. त्या कराराला "सॉलेम लीग आणि कॉव्हेनंट " असें ह्मणतात.

( ९ ) पार्लमेंटला कवायती फौजेची जरूर आहे असे पाहून क्रॉमवेल त्या उद्योगाला लागला. त्यानें उत्तम कवायतीनें कसलेल्या, देशाकरितां प्राणावर उदार झालेल्या व ईश्वरनिष्ठ अशा लोकांचा एक रिसाला तयार केला. या फौजेला कधींही अपयश न आल्यामुळे त्याला "आयर्न साइड्स्" असें नाव पडलें.

(१०) चार्लस् जिवंत असेपर्यंत देशाला स्वस्थता मिळणार नाहीं तेव्हा "हा घातकी मनुष्य मेलाच पाहिजे" असा क्रॉमवेलनें निश्चय केला. परंतु पार्लमेंटमधील सर्वच सभासदांना असें वाटत नव्हतें ह्मणून क्रॉमवेलच्या विरोधी सभासदांना कर्नल प्राइड यानें पार्लमेंटमधून हाकून दिलें. कर्नल प्राइडच्या या कृत्याला "प्राइड्स् पर्ज" असें ह्मणतात व त्यानंतरच्या अवशिष्ट पार्लमेंटला "रंप" असें ह्मणतात.

( ११ ) नॅव्हिगेशन ॲक्ट.—डच व्यापार हाणून पाडण्याकरितां क्रॉमवेलच्या प्रेरणेनें १६५१ सालीं हा कायदा पास करण्यात आला. इंग्लंड व इंग्लिश वसाहती आणि इतर राष्ट्रें यामधील सर्व व्यापाराची नेआण इंग्लिश खलाशांनीं चालविलेल्या इंग्लिश जहाजातून किंवा ज्या राष्ट्रांतील माल असेल त्या राष्ट्राच्या जहाजातूनच झाली पाहिजे. मध्ये दुसऱ्या राष्ट्राच्या जहाजाची दलाली असू नये. असा या कायद्याचा अर्थ होता.

( १२ ) डच लोकांशीं युद्ध ( प्रश्न ५६ पहा )

( १३ ) रंप पार्लमेंटः—"प्राइड्स् पर्ज" वरील टिप्पणी पहा.

( १४ ) बेअरबोन पार्लमेंट.—१६५३ मध्यें रंप पार्लमेंट बर-

खास्त झाल्यावर क्रॉमवेलने पार्लमेंटचे काम करण्याकरितां एक कौंसिल नेमिलें. यांतील सर्व सभासद क्रॉमवेलच्या विश्वासांतले व प्युरिटन होते. याला "**लिट्ल् पार्लमेंट**" व थट्टेनें "**बेअरबोन पार्लमेंट**" असें ह्मणत कारण यांत "**बेअरबोन**" असें चमत्कारीक नांव असलेला एक सभासद प्रमुख होता.

( १५ ) पार्लमेंट सभेची बैठक बोलवावयाची असल्यास त्यासाठीं राजाच्या आज्ञापत्राची जरूरी असते. प्रोटेक्टोरेटच्या शेवटीं जें पार्लमेंट बोलावण्यांत आलें तें इतर बाबतींत नेहमींच्या पद्धतीला अनुसरून होतें. परंतु त्यावेळीं इंग्लंडांत राजा नसल्यामुळें राजाच्या आज्ञापत्राखेरीजच बोलावण्यांत आल्यामुळें त्याला "**कन्व्हेंशन् पार्लमेंट्**" असें ह्मणतात.

( १६ ) कन्व्हेंनशन पार्लमेंटमध्ये राजपुत्र चार्ल्स् याला परत बोलाविण्यासंबंधीं चर्चा चालली असतां जनरल मंकच्या सूचनेवरून राजपुत्र चार्ल्स् यानें **ब्रेडा** येथें एक जाहीरनामा प्रसिद्ध केला. या जाहीरनाम्याला "The declaration of Breda" उर्फ "**ब्रेडाचा जाहीरनामा** असें ह्मणतात. ( १ ) मागील दहा वर्षांच्या अवधींतील गुन्ह्यांबद्दल सर्वांना माफी करण्याचें ( २ ) धार्मिक बाबतींत सवलतींचें धोरण ठेवण्याचें ( ३ ) आणि पार्लमेंटच्या सल्ल्यानें राज्यकारभार चालविण्याचें या जाहीरनाम्यांत चार्ल्सनें वचन दिलें होतें.

नतां ते अमेरिकेंत जाऊन पोहोंचले. व तेथें त्यानीं एक वसाहत स्थापन केली. या लहानशा टोळीला पुढें " **पिलग्रिम् फादर्स** " अथवा ' **यात्रेकरी गुरुजन** " असें नाव पडलें.

( १९ ) **थरो**:— **वेंटवर्थ उर्फ स्ट्रॅफर्ड** हा आयर्लंडचा लॉर्ड डेप्युटी असतांना त्यानें तेथें जी राज्यपद्धति अंमलांत आणिली होती तिस तो " **थरो** " ह्मणजे " **पूर्ण** " असें ह्मणत असे. राज्यकर्त्यांची मर्जी ह्मणजेच कायदा अशी ती पद्धत असून सर्व विरोध तो जागच्या जागींच चिरडून टाकीत असे.

( २० ) **इन्स्टुमेंट ऑफ् गव्हर्नमेंट**:—बेअरबोन पार्लमेंट बरखास्त झाल्यावर राज्यकारभागची कांहीं तरी व्यवस्था लागावी ह्मणून कौंसिल ऑफ् स्टेटनें एक मसुदा तयार केला. त्याला "**इन् स्टुमेंट ऑफ् गव्हर्मेंट**" अथवा "**राज्यकारभागची घटना**" असें नांव आहे. क्रॉमवेलला लॉर्ड प्रोटेक्टर नेमून त्यानें सर्व कारभार पहावा व त्यानें २१ सभामदाचें एक कौंसिल ऑफ् स्टेट व ४६२ सभासदांचें एक पार्लमेंट याच्या सल्ल्यानें राज्यकारभार हाकावा अशी त्याची कल्में होतीं.

**५८ चरित्रें लिहा:—जॉन हॅमडन, जॉन् पिम्, स्ट्रॅफर्ड, लॉड व ब्लेक.**

**जॉन् हॅमडन्** हा सिव्हिलवॉर मधील पार्लमेंटरी पुढाऱ्यांपैकीं एक होता. तो विशेषेंकरून **शिप्मनी** प्रकरणांत (प्रश्न ५७-( ३ ) पहा ) प्रसिद्धीस आला. त्यानें हा बेकायदेशीर कर देण्याचें नाकारल्यावर त्याच्यावर खटला करण्यांत आला. व न्यायाधिशांनीं त्याच्याविरुद्ध निकाल दिला. सिव्हिल वॉर मध्यें त्यानें प्रामुख्यानें भाग घेतला होता व " शाल्ग्रोव्हफील्ड " येथील लढाईत तो मारला गेला. त्याची कर्तबगारी व धैर्य हे गुण प्रशंसनीय होते.

थोड्याच अवधींत त्यानें चांगलें नाव मिळविलें. ड्रेकनें जसा एलिझबे-थन काळीं आपल्या नांवाचा दरारा बसविला तसाच ब्लेकनें क्रॉमवेलच्या कारकीर्दीत डच लोकांवर वचक बसविला. ॲडमिरल ब्लेकने **पोर्टलंड** येथें डच आरमाराचा पुरा फडशा उडविला. तेव्हां-पासून हॉलंड किंवा स्पेन यांनीं इंग्लंडविरुद्ध डोकें वर काढलें नाहीं.

५९ [अ] Sketch The career of Cromwell, [ब] and describe his character and Policy (Political and religious, Home and Foreign):—**क्रॉमवेलचें चरित्र सांगून त्याचा स्वभाव व परराष्ट्रीय, अंतःस्थ, धार्मिक आणि राजकीय धोरण सांगाः—**

[ अ ] सुप्रसिद्ध सेनापती ऑलिव्हर क्रॉमवेल, हा आठव्या हेनरीचा मंत्री थॉमस् क्रॉमवेल याच्या वंशातला असून त्याचा जन्म १५९९ सालीं झाला. तो १६२८ व १६४० मधील पार्लमेंटचा सभासद असून सिव्हिल वॉरमध्यें विशेष प्रसिद्धीस आला. "आयर्न साइड्स्" या नावानें प्रसिद्ध असलेल्या आपल्या अजिंक्य फौजेनिशीं त्यानें **मार्स्टनमूर, नेसबी, प्रेस्टन व डरबान** येथील लढाया जिंकल्या.

चार्लसला देहांत शासन क्रॉमवेलच्या प्रेरणेनेंच झालें. तोच पार्ल-मेंटचा पुढारी झाला व चार्लसच्या मृत्यूनंतर स्वतःच्या मृत्यूपर्यंत इंग्लंडचा **अनभिषिक्त राजाच** होता.

थोड्याच अवधींत त्यानें चांगलें नाव मिळविले. ड्रेकनें जसा एलिझबेथन काळीं आपल्या नांवाचा दरारा बसविला तसाच ब्लेकनें क्रॉमवेलच्या कारकीर्दीत डच लोकांवर वचक बसविला. ॲडमिरल ब्लेकने पोर्टलंड येथें डच आरमाराचा पुरा फडशा उडविला. तेव्हांपासून हॉलंड किंवा स्पेन यांनीं इंग्लंडविरुद्ध डोके वर काढलें नाहीं.

५९ [अ] Sketch The career of Cromwell, [ब] and describe his character and Policy ( Political and religious, Home and Foreign ) :—**क्रॉमवेलचें चरित्र सांगून त्याचा स्वभाव व परराष्ट्रीय, अंतःस्थ, धार्मिक आणि राजकीय धोरण सांगाः—**

[ अ ] सुप्रसिद्ध सेनापती ऑलिव्हर क्रॉमवेल, हा आठव्या हेनरीचा मंत्री थॉमस् क्रॉमवेल याच्या वंशातला असून त्याचा जन्म १५९९ सालीं झाला. तो १६२८ व १६४० मधील पार्लमेंटचा सभासद असून सिव्हिल वॉरमध्यें विशेष प्रसिद्धीस आला. " आयर्न साइड्स् " या नांवाने प्रसिद्ध असलेल्या आपल्या अजिंक्य फौजेनिशीं त्यानें **मार्स्टनमूर, नेसबी, प्रेस्टन** व **वरचान** येथील लढाया जिंकल्या.

चार्लसला देहांत शासन क्रॉमवेलच्या प्रेरणेनेंच झालें. तोच पार्लमेंटचा पुढारी झाला व चार्लसच्या मृत्यूनंतर स्वतःच्या मृत्यूपर्यंत इंग्लंडचा **अनभिषिक्त राजाच** होता.

क्रॉमवेलचें नाव ऐकताच निरनिराळ्या लोकांच्या मनात निरनिराळे व परस्परविरोधी विकार उठतात. तो जिवंत असताना त्याची कारकीर्द इंडिपेन्डंट लोकांशिवाय दुसऱ्या कोणालाच आवडली नाही. त्याचे नाव ऐकतांच आयरिश लोकांना अजूनही त्वेष चढतो. पण एवढी गोष्ट खरी कीं त्याचा मोठेपणा त्याच्या शत्रूंनाही नाकारतां येत नाहीं. राजपक्षीय क्लॅरेंडन् म्हणतो " His greatness at home

was but a Shadow of the glory he had abroad" युरोपमधील निख्यात सेनापतींमध्यें त्याची गणना होते. गृहस्थ या नात्यानें त्याची वर्तणूक प्रशंसनीय होती.

(ब) त्यानें हॉलंड व स्पेन यांच्या समुद्रावरील वर्चस्वाचा नायनाट केला. व युरोपमध्यें इंग्लंडच्या नावाचा दरारा बसविला. या कामगिरीबद्दल त्याची अजूनही प्रशंसा ऐकू येते (क) परराष्ट्रीय राजकारणात जसें क्रॉमवेलला यश आलें, तसें त्याला स्वदेशीं आलें नाहीं. त्यानें पुष्कळ सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न केला पण व्यर्थ लोकसत्ताक राज्य सुरू करण्याची कल्पनाही त्याला सोडून द्यावी लागली कारण इंग्लंडची त्या गोष्टीला अजून तयारी झाली नव्हती " मोडणें सोपें पण जोडणें कठीण " हा नियम त्याच्या अनुभवास आला सिव्हिल वॉर ही राजाच्या अनियंत्रित सत्तेला आळा घालण्याचे उद्देशानें उद्भूत झाली होती पण ही गोष्ट लक्षात ठेवण्याजोगी आहे कीं सिव्हिलवॉर नंतरचा क्रॉमवेलचा कारभार टयूडर किंवा स्टुअर्ट राजाच्यावर ताण करणारा होता. त्याचीं पुष्कळ कृत्यें बेमनदगीर असून त्याच्या कारकीर्दीत लष्करी सत्तेला महत्व प्राप्त झालें होतें त्यानें राज्याचा बंदोबस्त फारच कडक रीतीनें व सुयंत्र राखला होता पण तो तरवारीच्या जोरावर असल्यामुळें त्याच्या अमलाला "Military Despotism" अथवा अनियंत्रित लष्करशाही" असेंही ह्मणतात.

(ड) क्रॉमवेल हा कट्टा प्युरिटन होता. त्यानें धार्मिक बाबतींत सहिष्णुतेचे धोरण जाहीर केलें होतें पण ही सहिष्णुता फारच आकुंचित स्वरूपाची होती. ह्मणजे खाजगी रीतीनें वाटेल त्या पंथाचे आचार विचार पाळावे. खासगी रीतीनें कोणताही पंथ पाळला तरी त्याकडे तो दुर्लक्ष करीत असे. पण जाहीर रीतीनें

प्युरिटन पंथाप्रमाणें वागण्याचा हुकूम होता. व या पंथाचें या कारकीर्दीत प्राबल्य असल्यामुळें या अंमलाला **"प्युरिटन अंमल"** असेंही नांव आहे.

**६० प्युरिटन अमलाचें वर्णन करा:—**

पहिल्या चार्ल्सच्या इतिश्रीनंतर इंग्लंडमध्यें प्युरिटन लोकांचेंच साम्राज्य होतें. प्युरिटन लोकांच्या समजुतीप्रमाणें नुसतें हसणेंसुद्धा पाप असे व खळणें, नाचणें, नाटकें पहाणें, नृत्य, गायन वादन इत्यादि गोष्टी गुन्हे समजले जात असत. तेव्हा या अमलांत या गोष्टींविरुद्ध कडक उपाय योजण्यात आले नाटकगृहें बंद करण्यांत आलीं तसबिरी व प्रतिमा चर्चमधून काढून फेंकून देण्यात आल्या. धार्मिक बाबतींत मतस्वातंत्र्य व आचारस्वातंत्र्य जाहीर करण्यात आले होते. पण कॅथॉलिक व एपिस्कोपल पंथीय लोकांना त्याचा फायदा देण्यात आला नाहीं "पॅरॅडाईज लॉस्ट" व पॅरॅडाइज रिगेन्ड" या पुस्तकात **मिल्टननें** व 'पिलग्रिम्स प्रोग्रेस' या पुस्तकात **जॉन बन्यननें** प्युरिटन लोकांचे विचार उत्तम रीतीनें मांडले आहेत

**६१ रेस्टोरेशनच्या वेळी लोकांची मनःस्थिती कशी होती? चार्ल्सच्या आगमनानंतर त्यांत काय फरक घडून आला? या मनःस्थितीचा चार्ल्सला कितपत फायदा करून घेता आला ते लिहा:—**

पहिल्या चार्ल्सनंतर इंग्लंडात धुमाकूळ घालीत असलेल्या कडव्या प्युरिटन अमलाला (प्रश्न ६० पहा) व अनियंत्रित लोकसत्तेला लोक कंटाळले व **"मागच्या खोता तूंच बरा"** अशी त्याची मनःस्थिति झाली. पूर्वीचीच राजसत्ता बरी असें त्याना वाटू लागलें. व त्यानीं राजपुत्र चार्ल्सला पाचारण केलें.

शास्त्राचा असा सिद्धांतच आहे कीं "क्रिया व प्रतिक्रिया ह्या

तुल्यबल असून, त्या निरुद्ध दिशेनें प्रवर्तित होत असतात." ( Action and Reaction are equal and opposite ) या सिद्धांताची सत्यता या ठिकाणीं उत्तमरीतीनें प्रतीत होते. चार्ल्स हा स्वत विलासी व चैनी होता तेव्हा त्याच्या आगमनानें लोकाना अर्थातच आनद झाला. प्युरिटन साधु याचा त्याना कटाळा आलाच होता. तेव्हा नवीन कारकीर्दीबरोबर नृत्य, नायन, नाटकगृहे वगैरे-चाही प्रवेश झाला. ही प्रतिक्रिया इतक्या जोराची झाली व विलासप्रियता आणि चैनबाजी इतकी बोकाळली कीं पुष्कळ विलासी प्रकार दरबारात उघडरीतीनें प्रवेश करूं लागले.

अशा रीतीनें राजा व प्रजा याचा एकदिल झाल्यामुळें तो लोक प्रिय झाला व आपला हेतु ( प्रश्न ७६ पहा ) तडीस नेता येईल असें त्यास वाटूं लागलें पण लोकाची राजापेक्षा इग्लडच्या राष्ट्रीय धर्मालयावर जास्त भक्ती असल्याचें आढळून आल्यामुळें त्याला आपलें कार्य साधितां आलें नाहीं.

**६२ रेस्टोरेशन व दुसरा चार्ल्स प्रिय होण्याचीं कारणें सांगाः**— ( प्रश्न ६१ पहा )

**६३ दुसऱ्या चार्ल्सला " मेरी मॉनर्क " व तत्कालीन इंग्लंडला "मेरी इंग्लंड" कां म्हणण्यांत येतें?** (प्रश्न ६१ पहा)

**६४ रेस्टोरेशन नंतर कन्व्हेन्शन पार्लमेंटनें काय कामगिरी केली ती सागा —**

(१) ॲक्ट आफ् इन्डेम्निटि "उर्फ माफीचा कायदा" पास करण्यात आला या कायद्याअन्वयें ज्या लोकाचें, पहिल्या चार्ल्सला देहात शिक्षा देण्यात प्रत्यक्ष अग होतें त्याखेरीज इतर सर्वांस माफी देण्यातआली.

( २ ) प्रजासत्ताक राज्यात झालेल्या जप्त्या बेकायदेशीर ठरवून रद्द करण्यात आल्या व जमीनी पूर्वींच्या मालकाना परत देण्यात आल्या.

(४) फक्त तीन फलटणी ठेवून क्रॉमवेलच्या कारकीर्दीतील इतर सर्व खड्या सैन्याला रजा देण्यात आली.

(४) राजाच्या खासगी उत्पन्नाची वार्षिक रक्कम ठरविण्यात आली व ती त्याच्या हयातापर्यंत देण्याचें मजूर झालें.

(५) प्रेस्बिटेरियन् लोकाना काढून टाकून पुन्हा एपिस्कोपेलियन धर्माधिकारी नेमण्याच्या प्रयत्नाला सुरवात झाली तोंच पार्लमेंट बरखास्त झालें

**६५ कॅन्हेंशियर पार्लमेंट म्हणजे काय? या पार्लमेंटानें केलेल्या कामाची थोडीशा माहिती द्याः—** कन्व्हेनशन पार्लमेंट १६६० साली बरखास्त झाल्यावर १६६१ साली चार्ल्सच्या अमदानींतील दुसरें पार्लमेंट बोलाविण्यात आले या पार्लमेंटमध्यें राजनिष्ठ सभासदाचाच भरणा जास्त असल्यामुळें या पार्लमेंटला **"रॉयालिस्ट पार्लमेंट"** किंवा **"कॅन्हेंशियर पार्लमेंट"** असें ह्मणतात. या सभेत राजपक्षीय लोकाचे मताधिक्य (Majority) असल्यामुळें तिनें राजाला अनुकूल अशा पुष्कळ गोष्टी केल्या.

(१) "राजाच्या समतीशिवाय पार्लमेंटनें कोणताही कायदा पास करू नये' असा कायदा पास करण्यात आला.

(२) लष्करी व आरमारी सत्ता पुन्हा राजाच्या हातात देण्यात आली.

(३) राजाच्या विरुद्ध प्रजेनें शस्त्र उपसणें बेकायदेशीर ठरविण्यात आले पण या कारकीर्दीतील मुख्य गोष्ट ह्मणजे "क्लॅरेंडन कोड्" पास करणें ही होय. हे कायदे प्युरिटन लोकाना दडपून टाकण्याकरिता व जवळ जवळ त्याच्यावर सूड उगवण्याकरिता केले होते

**६६ write Short note on the Clarendon ministry क्लॅरेंडननें प्रधान या नात्यानें केलेल्या कामगिरीचें वर्णन कराः—**

चार्ल्स गादीवर आल्यावर त्याच्या कारकीर्दीतील पाहिलीं ७ वर्षे क्लॅरेंडन हा त्याचा मुख्य मंत्री असून, पार्लमेंटरी सभासदांवर त्याचें वरेंच वजन होतें. याच्याच प्रेरणेनें कॅव्हेलियर पार्लमेंटनें प्युरिटन लोकाविरुद्ध कडक धोरण स्वीकारलें होतें. परराष्ट्रीय राजकारणाच्या बाबतींत स्पेनशीं वैर व फ्रान्सशीं सख्य हें एलिझबेथचेंच धोरण त्यानें अंगिकारलें होतें या नंतरची मुख्य गोष्ट ह्मणजे हॉलंडशीं युद्ध. ( प्रश्न ७३ पहा ) हें होय. हें युद्ध चालू असताना इग्लंडवर दोन अनर्थ कोसळले. एक प्लेग आणि दुसरी आग. (प्रश्न ७८ पहा) या आपत्तींतुन इंग्लंडची सुटका होते न होते तोंच, डच युद्धात इंग्लंडला हार खावी लागली. व **ब्रेडा** येथें एक अपमानकारक तह कबूल करणें भाग पडलें. या अपयशाचें खापर क्लॅरेंडन याच्या माथीं मारण्यात आलें. ही संधी साधून चार्ल्सनें त्याला मंत्र्याच्या जागेवरून कमी केलें.

**६७ क्लॅरेंडनच्या अधःपतनाला काय कारणें झालीं तीं लिहा:—** What led to the fall of Clarendon :— (१) दुसरा चार्ल्स फार उधळ्या असल्यामुळें **डंकर्क** हें बंदर त्यानें फ्रान्सला ५० लक्ष रुपयांस विकलें. पण लोकांनीं क्लॅरेंडनलाच जबाबदार धरलें. (२) त्याच्या धार्मिक धोरणामुळें प्युरिटन लोक त्याचा फार द्वेष करूं लागले. (३) क्लॅरेंडन हा एपिस्कोपल चर्चचा पक्का अनुयायी होता. व अत्यंत सदाचारी असून त्यानें चार्ल्सच्या विलासी, चैनी व बदफैली वागणुकीबद्दल त्याची अनेक वेळा कानउघाडणी केली. या गोष्टींमुळें तो राजालाही अप्रिय झाला होता. अशा रीतीनें सर्व पक्ष त्याजवर नाराज झाले होते. (४) याच सुमारास डच युद्धांत इंग्लंडला अपयश आलें. वास्तविक क्लॅरेंडन पहिल्यापासूनच या युद्धाच्या विरुद्ध होता. व सर्व दोष चार्लसचा होता. पण या अपयशाचें

खापर क्लॅरेंडनच्या माथीं मारण्यात आलें. चार्ल्सनें त्याला वडतर्फ केलें व पार्लमेंटनें त्याच्यावर खटला करण्याचें ठरविलें. तेव्हा त्यानें इंग्लंडांतन पळ काढला.

६८ What do you know of the Cabal ministry Why was it so named? **केवल मिनिस्ट्रि ह्मणजे काय? हें नांव कसें पडलें ? या प्रधान मंडळानें केलेल्या कामगिरीचें थोडक्यांत वर्णन करा** :—क्लॅरेंडनच्या वडतर्फीनंतर चार्ल्सने एका खुपमस्कन्य। प्रधानमंडळाकडे राज्य कारभाराचीं सर्व सूत्रें दिलीं. या मंडळामध्यें क्लिफर्ड, आर्लिंग्टन, बकिंगहॅम, अॅशले व लॉडरडेल हे पाच सभासद होते. त्यांच्या नांवाचीं पहिलीं अक्षरें घेतलीं असता **केवल** ( cabal ) असा शब्द बनत असल्यामुळें या प्रधान मंडळाला **केवल मिनिस्ट्रि** असें ह्मणतात. केवल या शब्दाचा अरबीभाषेंत " **गुप्त** " असा अर्थ आहे. या प्रधान मंडळाची महत्वाची कामगिरी ह्मणजे इंग्लंड, स्वीडन, आणि हॉलंड या तीन देशांचें फ्रान्स विरुद्ध जमवून आणलेलें त्रिकूट ( triple alliance ) होय. यानंतर चार्ल्सनें डोव्हर येथें लुईशीं गुप्त तह केला. (प्रश्न ७८ पहा) हा तह अॅशले शिवाय इतर प्रधानाना माहीत होता. या तहानें चार्ल्स फ्रान्सचा पेन्शनर बनला. या तहाअन्वयें चार्ल्सनें कांहीं एक कारण नसता हॉलंडशीं युद्ध जाहीर केलें. व अॅशलेच्या सल्लयानें रोमन कॅथोलिक लोकांना सवलती देण्याच्या हेतूनें एक जाहीरनामा प्रसिद्ध केला. ( Declaration of Indulgence. ) चार्ल्सच्या या दोन्ही गोष्टी लोकांना न आवडून त्याच्या धोरणा विरुद्ध चळवळ सुरू झाली. तेव्हां पार्लमेंट बोलावणें भाग पडलें. या पार्लमेंटनें एपस्कोपल पंथाव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याही। पंथीय गृहस्थाला राज्यकारभारांतील जागेवर नेमूं नये असा कायदा केला.

[ ७८- (६) पहा ] पण केवल प्रधान मंडळांत दोन रोमन कॅथोलिक लोक होते. त्यांना कायद्याअन्वयें दूर करावें लागल्यामुळें हें प्रधानमंडळ मोडलें.

**६९ केवल प्रधानमंडळ मोडलें जाण्याचें कारण सांगा:-** What led to the break-up of the cabal ministry? ( प्रश्न ६८ पहा )

७० What do you know of Danby's administration and policy? **डॅन्बीच्या राज्याकारभाराविषयीं व त्याच्या धोरणाविषयीं तुह्मांस काय माहिती आहे?**—केवल मंत्रिमंडळ मोडलें गेल्यावर चार्ल्सनें अर्ल ऑफ् डॅनबी या गृहस्थास मुख्य प्रधान नेमिलें. त्याला वशीकरणविद्या (लांच दाखवून दुसऱ्याला आपल्या बाजूला वळवून घेण्याची कला ) चांगली अवगत असल्यामुळें चार्लसला त्याचा बराच उपयोग झाला. यानें क्लॅरेंडनचेंच धोरण पुढें चालविलें. हॉलंडशीं दोस्ती जमवून आणली व जेम्सची वडील मुलगी मेरी हिचा हॉलंडचा राजपुत्र विल्यम् ऑफ् ऑरेंज याच्याशीं विवाह घडवून आणला. १६७८ मध्यें लुईनें चार्लसबरोबर पुन्हा करारमदार केले. डॅन्बीला हा तह पसंत नव्हता, पण राजाज्ञेमुळेंच त्यानें त्याच्यावर सही केली. पण डॅन्बी हा लुईचा शत्रू असल्यामुळें त्यानें हा तह पार्लमेंटच्या दृष्टोत्पत्तीस आणला. पार्लमेंटनें डॅन्बीलाच जबाबदार धरून त्याला तुरुंगांत टाकिलें.

७१ What were the political relations of Charles II and Louis *XIV* of France? How did they affect the Home and Foreign policy of England? **दुसरा चार्ल्स व चवदावा लुई यांचे राजकीय संबंध काय होते? त्यांचा इंग्लंडच्या अंतःस्थ व परराष्ट्रीय धोरणावर कसा काय परिणाम झाला?**:—पहिल्या चार्लसच्या वधानंतर

दुसरा चार्लस इंग्लंडातून पळून फ्रान्सच्या आश्रयाला गेला होता. याशिवाय चार्लस व लुई यांचें आतेमामेभाऊ असें नातें होतें यामुळें त्याचें फारच सख्य होतें.

कॅथोलिक पंथाची पुनःस्थापना व अनियंत्रित राज्यकारभार हें चार्लसचें ध्येय होतें. याकरितां द्रव्याची गरज होती. उलटपक्षीं लुईला युरोपमध्यें अग्रपूजेचा मान मिळवावयाचा होता व त्याकरिता त्याला इंग्लंडच्या मदतीची अपेक्षा होती. अशा रीतीनें या दोन गरजवंताची मैत्री दृढ झाली व त्याचें पर्यवसान **डोव्हरच्या गुप्त तहांत झालें.**

या संबंधामुळें इंग्लंडच्या अंतस्थ व परराष्ट्रीय धोरणावर पुष्कळच परिणाम घडून आला फ्रान्सकडून मिळालेल्या पैशाच्या जोरावर चार्लसनें पुष्कळ सभासदांना वश करून घेतलें. कॅथोलिक लोकांना सवलती देण्याचा प्रयत्न केला व शक्य तों पार्लमेंटच्या मदतीशिवायच राज्यकारभार हाकण्याचा प्रयत्न केला. त्याच्या ह्या परराष्ट्रीय धोरणामुळें पुष्कळ मंत्रिमंडळें मोडलीं गेलीं.

हॉलंड विरुद्ध लुईची मोहीम असल्यामुळें चार्लसलाही हॉलंडविरुद्ध युद्ध पुकारणें भाग पडलें पण हॉलंडसारख्या प्रॉटेस्टंट राष्ट्राशीं युद्ध करणें इंग्लिश जनतेला न आवडल्यामुळें राजा व प्रजा यांच्यामध्यें विरोध उत्पन्न झाला व याचाही परिणाम मंत्रिमंडळें मोडणें व कॅथोलिक लोकांविरुद्ध मोहीम हाच झाला.

७२ What were the foreign relations of Charles II? Show that his relations with France guided his home as well as foreign policy (१) चार्लसचें परराष्ट्रीय धोरण सांगा. (२) चार्लसचा फ्रान्सशीं असलेला संबंध इंग्लंडातील राजकीय व धार्मिक घडामोडींच्या मुळाशीं होता हें विधान खरें आहे काय?:—(प्रश्न ७१ पहा.)

**७३ (१) दुसऱ्या चार्ल्सच्या कारकीर्दीत** डच लोकांशीं युद्धें होण्याचीं कारणे सांगा. (२) या युद्धाची थोडक्यात हकीकत द्या. (३) या युद्धांचा परिणाम काय झाला हे सागा.—

**डच लोकांशीं पहिलें युद्धः**—कारणें (१) इंग्लंड व हॉलंड या दोन राष्ट्रात व्यापाराविषयक चुरशीमुळें वितुष्ट आलें.

(२) हकीकतः—**ॲडमिरल डी रायटर** हा नावाजलेला **सेनापति** डच आरमारचा नेता असून त्याने इंग्लिश आरमाराचा मुख्य **मंक** याचा **डन्स**जवळ पराभव केला. नंतर इंग्लिश लोकानीं **डच** लोकांचा नॉरफोक येथे पराभव केला. पण याच वेळीं इंग्लंड-मध्यें मोठी आग लागल्यामुळें युद्ध तहकूब करावें लागलें तेव्हा **जॉन डी विटच्या** नेतृत्वाखाली डच आरमारानें टेम्स नदींत प्रवेश केला. अखेर ब्रेडाच्या तहानें हें युद्ध थांबलें (१६६७).

**(३) परिणामः**—या युद्धांत इंग्लंडला हार खावी लागून ब्रेडा येथील अपमानकारक तहाला कबूल व्हावे लागले. या सर्व अपयशाचे खापर क्लॅरेंडनच्या माथीं मारण्यात येऊन त्याला चडतर्फ करण्यात आलें.

(२) डच लोकांशीं दुसरें युद्ध:—१६७२–१६७४ (अ) कारणें:—डोव्हरच्या तहामध्यें असें एक कलम होते कीं, चार्ल्सनें लुईला डच लोकांविरुद्ध मदत करावी. तेव्हां लुईनें हॉलंडविरुद्ध युद्ध पुकारल्याबरोबर चार्ल्सलाही तसें करणें भाग पडले.

(ब) हकीकत:- या युद्धात इंग्लिश आरमाराच्या डच आरमाराशीं दोनतीन चकमकी झाल्या. त्या सर्वांत इंग्लंडला अपयशच येऊन वेस्टमिनिस्टर येथें तह करणें भाग पडलें.

(क) परिणाम:—चार्ल्स व त्याचे मंत्री याजविरुद्ध लोकमत क्षुब्ध झालें. जुनें मंत्रिमंडळ मोडून डॅन्बी हा प्रधानाच्या जागेवर आला. त्यानें हॉलंडशीं सख्य केलें व तें अधिक दृढ करण्याच्या हेतूनें

जेम्सच्या वडील मुलीचें हॉलंडच्या वुइल्यमशीं लग्न घडवून आणिलें.

७४ Show that the second Dutch wai was due to the secıet treaty of Dovei.

**दुसरें डच युद्ध हें डोव्हरच्या गुप्त तहाचा परिणाम होय हें विधान सत्य आहे काय?:—**

प्रश्न ७३, (२) अ पहा

७५ Wiite a short note on the chaiıctei & policy of Chailes II.

**दुसऱ्या चार्ल्सचा (१) स्वभाव व (२) धोरण यांजविषयीं माहिती द्या.—**

(१) दुसरा चार्ल्स हा जात्याच हुषार होता. धैर्य व प्रसंगावधान हे गुण त्याच्या अंगी जन्मसिद्ध होते. तो मोहक, दिलदार, व बोलका होता. फ्रान्समधील विलासी आचरणाचा त्याच्या मनावर बराच परिणाम झाला होता. आपला स्वार्थ साधण्यासाठीं वाटेल ते सुष्ट दुष्ट उपाय योजण्यांत त्याला यत्किंचितही दिक्कत वाटत नसे. बाह्य दृष्टीला तो विलासी, चैनी व रंगेल भासत असे. पण त्याची महत्वाकांक्षा जबर होती. (पॅरा २ पहा)

(२) जरी चार्ल्स बाहेरून ख्यालीखुशालींत दंग असल्याचें आढळून येई, तरी तो फार धूर्त होता व दोन हेतू साधण्यासाठी त्याचे सतत प्रयत्न चालले होते. (१) कॅथोलिक लोकांना मतस्वातंत्र्य देणें (२) पार्लमेंटच्या मध्यस्तीशिवाय राज्यकारभार चालविणें हे ते हेतू होत. पण तो कधींही घाई करीत नसे. वाट पहाण्याची खुबी त्याला साधली होती. जोराचा प्रतिकार झाल्यास तो माघार घेई. बापाच्या उदाहरणावरून तो पुष्कळ शहाणपण शिकला होता. राजकीय धोरणाच्या बाबतींत तो हॅनोव्हरीयन राजाचा पूर्वगामी होता

असें ह्मणतात तें पुष्कळ अंशीं खरें आहे. (He was a precursor of the Georgian policy.)

७६ What was the chief aim of Charles II? How far did he achieve it? **दुसऱ्या चार्लसचें ध्येय काय होतें? तें त्याला कितपत साधितां आलें तें सांगा:—** कॅथोलिक लोकांना मतस्वातंत्र्य देणें, व पार्लमेंटच्या मध्यस्तीशिवाय राज्यकारभार हाकणें हे त्याचे दोन जीवितहेतू होते ते साधण्यासाठीं त्यानें अनेकवार प्रयत्न केले. दुसऱ्या बाबतींत त्याला मधून मधून यश आलें पण पहिली गोष्ट त्याला कधींही साधता आली नाहीं; कारण कॅथोलिक लोकांविरुद्ध लोकमत फारच क्षुब्ध होतें.

७७ "To all outward appearances, he (Charles II) was given to merriment. But he was a man of purpose and was bent upon achieving it" Examine the statement. **दुसरा चार्लस हा ख्यालीखुशालींत दंग असल्याचें बाह्यतः आढळून येत होतें तरी त्याला एक कार्य साधावयाचें होतें व त्याकरितां तो आमरण झटत होता. या विधानाची सत्यता पारखा** –(प्रश्न ७५-७६ पहा)

७८ Write short notes on —(१) **ॲक्ट ऑफ् इन्डेम्निटी. (२) क्लॅरेंडन कोड (३) केवल प्रधानमंडळ (४) डोव्हरचा गुप्त तह (५) डिक्लेरेशन ऑफ् इंडल्जन्स् (६) टेस्ट् ॲक्ट्. (७) दि ग्रेट प्लेग ॲण्ड दि ग्रेट फायर ऑफ् लंडन (८) टायटस् ओट्सूचा कट (९) एक्सल्यूजन बिल् (१०) हेबिअस कॉर्पस् ॲक्ट् (११) राय हाऊस प्लॉट्.**

(१) ॲक्ट ऑफ् इंडेम्निटी अथवा माफीचा कायदा:—(प्रश्न ६४ पहा.)

(२) क्लॅरेंडन कोड:—(अ) कारणे:—कॅव्हेलियर पार्लमेंटमध्यें एपिस्कोपेलिअन लोकांचें मताधिक्य असून प्युरिटन लोकांचें उट्टें काढण्याच्या हेतूनें हे कायदे त्यांनीं पास केले होते. ते पास करवून घेण्यांत क्लॅरेंडन प्रमुख होता. ह्मणून या कायद्यांच्या समुच्चयाला **क्लॅरेंडन कोड** असें ह्मणतात. (ब) कलमें:—**दि कार्पोरेशन ॲक्ट** (१६६०):—"सॉलेम लीग" आणि "कॉव्हेनंटशीं" आपला संबंध नाहीं, राजाविरुद्ध युद्ध करणें बेकायदेशीर आहे असें जाहीर केल्याशिवाय व अँग्लिकन चर्चच्या धर्माधिकाऱ्याच्या हातून सॅक्रॅमेंट ग्रहण केल्याशिवाय कोणासही कार्पोरेशन किंवा म्युनिसिपॅलिटीच्या मंडळांत घेऊं नये.

(२) **ॲक्ट ऑफ युनिफॉर्मिटि** (१६६२):—सर्व धर्माधिकाऱ्यांनीं **बुक ऑफ कॉमन प्रेअर** (सामान्य प्रार्थनेचें पुस्तक) चाच उपयोग करून त्यांतील सर्व गोष्टी मानल्या पाहिजेत.

(३) **दि कॉन्व्हेंटिकल ॲक्ट** (१६६४) इंग्लिश चर्च (एपिस्कोपल) च्या मनुष्यांखेरीज इतर कोणत्याही पंथाच्या पांच लोकांपेक्षां जास्त लोकांच्या सभा बेकायदेशीर ठरविण्यांत आल्या.

(४) **दि फाइव्ह माईल ॲक्ट** (१६६५) ज्या धर्मोपदेशकांनीं ॲक्ट ऑफ युनिफार्मिटीप्रमाणें वागण्याचें नाकारलें, त्यांना शाळांतून शिकविण्याची किंवा कोणत्याही शहराच्या पांच मैलाच्या कक्षेत राहण्याची बंदी करण्यांत आली.

(III) **केवल प्रधान मंडळ** (प्रश्न ६८ पहा.)

(IV) **डोव्हरचा गुप्त तह**: - (अ) इंग्लंड, हॉलंड व स्वीडन यांचा फ्रान्सविरुद्ध स्थापन झालेला संघ (Triple alliance) लुईला न आवडून त्याला हॉलंडला एकटें गांठून ते जिंकावयाचें होतें. म्हणून त्यानें चार्लस्‌जवळ तहाचें बोलणें लाविलें. चार्लस्‌लाही, लुई-

कडून मदत पाहिजेच होती. (प्रश्न ६८). तेव्हां या परस्पर साहाय्यापेक्षी राजांमध्यें डोव्हर येथें एक तह घडून आला.

(ब) त्याचीं कलमें:—(१) चार्ल्सनें लुईला डच लोकांविरुद्ध मदत करावी. (२) चार्ल्सनें आपण कॅथोलिक असल्याचें जाहीर करावें. त्याचा मोबदला म्हणून (३) इंग्लंडला व्यापाराचे बाबतींत लुईनें सवलती द्याव्या.(४) चार्ल्सनें लुईला ३० लक्ष रुपये द्यावे. (५) व इंग्लिश जनता चार्ल्सच्या विरुद्ध उठल्यास त्याला मदत करावी असें ठरलें.

(क) परिणाम:—चार्ल्स फ्रान्सचा पेन्शनर बनला व तो पर-राष्ट्रीय व अंत:स्थ राजकारणांत आणि धर्मकारणांत लुईच्या धोरणानें वागूं लागला. हॉलंडशीं युद्ध पुकारलें व डिक्लेरेशन ऑफ इंडलजन्स हा जाहीरनामा प्रसिद्ध केला.

**(V) डिक्लेरेशन ऑफ इंडलजन्स** म्हणजे धार्मिक निर्बंधापासून मुक्त करणारा जाहीरनामा.हें फर्मान चार्ल्सनें मुख्यतः कॅथोलिक लोकांना धार्मिक स्वातंत्र्य देण्याकरितां काढिलें. पण लोकांचा जबर क्षोभ झाल्यामुळें हें फर्मान त्यास परत घ्यावें लागलें. ( १६७३ )

**(VI)** पार्लमेंटनें सवलतींचा जाहीरनामा परत घ्यावयास भाग पाडलें, इतकेंच नव्हे तर "टेस्ट ॲक्ट" उर्फ "कसोटीचा कायदा" या नांवाचा कायदा पास केला. (१६७३) एपिस्कोपेलिअन पंथाव्यतिरिक्त असेहल्या कोणत्याही गृहस्थास राज्यकारभारांत किंवा धर्मकारभारांत कोणतीही जागा देण्यांत येऊं नये व तशी दिली असल्यास त्याला त्या जागेवरून कमी करण्यांत यावें. असा या कायद्याचा आशय होता.

**(VII) ग्रेट प्लेग आणि ग्रेट फायर ऑफ् लंडन:—** यांतील पहिली आपत्ति १६६५ सालीं ओढवली. या प्लेगमुळें फारच हाहा:कार उडाला व लक्षावधी माणसें मृत्युमुखीं पडलीं. त्यावेळीं

रस्ते अरुंद व गलिच्छ असल्यामुळें ही सांथ फारच जोरानें पसरली. या आपत्तीपासून सुटका होते न होते तोंच दुसरी आपत्ति कोसळली. ही आपत्ति म्हणजे १६६६ सालचा अग्निप्रलय होय. अग्नीमुळें लंडन मधील दोनतृतीयांश घरांचा नाश होऊन अपरिमित नुकसान झालें. या प्रलयानें "सेंट पॉल्स कॅथेड्रल" नांवाचें प्रख्यात भजनालय जळून गेलें.

या आगीमुळें अप्रत्यक्ष रीतीनें लंडनचा फायदाच झाला. जुनीं, कोंदट, गलिच्छ घरें जळून खाक झाल्यामुळें नवीन तऱ्हेचीं आरोग्य-कारक घरें बांधण्यास वाव मिळाला

( VIII ) टायटसओट्सच्या कटाची कंडी:–१६७८ सालीं टायटस् ओट्स नांवाच्या एका बदमाष मनुष्यानें " चार्ल्स राजाचा वध करून फ्रेंच लोकांच्या मदतीनें इंग्लंडमध्यें रोमन कॅथोलिक पंथ स्थापन करावयाचा व चार्ल्सच्या जेम्स नांवाच्या कॅथोलिकपंथीय बंधूस गादीवर बसवावयाचें " असा कॅथोलिकपंथीय लोकांनीं गुप्त कट रचि‍ला असल्याची खोटीच कंडी पिकविली. ही कंडी सर्वत्र पसरून कॅथोलिकपंथीयांविरुद्ध लोकमत खवळलें. व त्या पंथाच्या पुष्कळ लोकांस शिक्षा ठोठावण्यात आल्या.

( IX ) एक्स्क्ल्यूजन् बिल्:—( अ ) कारणे:–टायटस् ओट्सनें पिकविलेल्या कंड्यामुळें लोकमत कॅथोलिक लोकांविषयीं कलुषित झालें होतें याचवेळीं पोपच्या अनुयायांच्या कटाविषयीं सर्वत्र अफवा पसरल्या होत्या. चार्ल्सचाही त्याच पंथाकडे ओढा होता. चार्ल्सचा भाऊ जेम्स हा पक्का कॅथोलिक होता. तेव्हां चार्ल्सच्या पश्चात् तोच गादीवर आल्यावर सर्वत्र कॅथोलिक अंमल सुरू होईल असें लोकांना वाटूं लागून १६७९ च्या पार्लमेंटांत शॅफ्ट्स्बरीकडून एक बिल आणलें गेलें. " जेम्स कॅथोलिकपंथीय

असल्यामुळें चार्ल्सच्या पश्चात् त्याला गादी न देतां ती प्रॉटेस्टंटपंथीय **डयूक ऑफ् मन्मथ्ला** यावी " असा या बिलाचा आशय असून त्याला " Exclusion Bill " अथवा **"वारसा रद्दीचा कायदा"** असें ह्मणण्यात येतें. भावाचा गादीवरील हक्क बुडेल या भीतीनें हा कायदा पास होण्यापूर्वीच चार्ल्सनें पार्लमेंट बरखास्त केलें.

**( X ) हेबिअस् कॉर्पस् ॲक्टः**—" कोणालाही चौकशी शिवाय अटकेंत ठेवूं नये " असें एक कलम मॅग्नाचॉर्टामध्यें होतें. पण टयूडर किंवा स्टुअर्ट राजानीं या कलमाकडे दुर्लक्ष करून पुष्कळ आरोपींना विगरचौकशी अटकेंत टाकिलें होतें. तेव्हां या गोष्टीला आळा घालण्याकरिता शॅफ्ट्स्बरीनें **"हेबिअस् कॉर्पस्ॲक्ट"** ऊर्फ **" शरीर संरक्षणाचा कायदा "** अंमलांत आणला. हें नाव पडण्याचें कारण असें कीं त्याच्या आरंभीं **हेबिअस् कॉर्पस्** ( Habeas Corpus ) ह्मणजे **" शरीर पुढें आणा "** ( produce the body ) असे शब्द आहेत. " कोणत्याही इंग्लिश गृहस्थास चौकशी शिवाय नुसत्या संशयावरून तुरगात ठेवूं नये; ठेवल्यास तुरुंगाचा रखवालदार व आरोपीची चौकशी न करणारा न्यायाधीश हे दोघेही शिक्षेस पात्र होत " असा त्या बिलाचा आशय आहे. व्यक्तिस्वातंत्र्याच्या दृष्टीनें हा कायदा महत्वाचा आहे.

**( XI ) राय हाऊस प्लॉटः**—टायटस् ओट्स्च्या कंडीनंतर शॅफ्ट्स्बरीच्या प्रेरणेनें चार्ल्सचा खून करण्याचा इरादानें **राय हाऊस** या ठिकाणीं एक कट रचण्यात आला. पण हा कट उघडकीस येऊन त्यांत अंग असलेल्या लोकांस पकडून फांशीं देण्यात आलें. स्वतः शॅफ्ट्स्बरी इंग्लंडमधून पळाल्यामुळें बचावला.

७९ ( १ ) जनरलमंक ( २ ) क्लॅरेंडन ( ३ ) डॅन्बी ( ४ ) व शॅफ्ट्स्बरी यांचीं थोडक्यांत चरित्रें द्या.—

( १ ) **जेनरल मंक**:—हा मोठा योद्धा असून सिव्हिल वॉरमध्यें त्याच्या अंगचें शौर्य क्रॉमवेलच्या नजरेस आलें. त्यानें त्याला स्कॉटलंडमध्यें शांतता राखण्याचे कामावर नेमिलें. ही कामगिरी त्यानें चोख रीतीनें बजावली. क्रॉमवेलच्या मरणानंतर जेव्हां पार्लमेंट व लष्कर यांच्यामध्यें बेबनाव झाला व अदागुदीचा प्रसंग आला (५६ पहा) तेव्हां त्यानें पार्लमेंटरी पुढाऱ्याची बाजू घेऊन लंडनवर स्वारी केली. लेंबर्टप्रभृति सेनापतींचा पराभव केला. व पार्लमेंटचें स्वातंत्र्य जाहीर केलें. याच्याच प्रेरणेनें पार्लमेंटनें राजपुत्र चार्ल्सला पाचारण केलें व याच्याच सल्ल्यावरून दुसऱ्या चार्ल्सनें ब्रेडा येथील जाहीरनामा प्रसिद्ध केला. दुसऱ्या चार्ल्सनें त्याला ७००० पौंड वर्षासन देऊन आल्बेमार्लेचा ड्यूक बनविलें. यानें दुसऱ्या चार्ल्सच्या कारकीर्दीतील डच युद्धांतही बरीच कामगिरी केली. परंतु त्याला समुद्रावर नितकें यश आलें नाहीं.

(२) **क्लॅरेंडन** हा सिव्हिल वॉरमध्यें राजाचे बाजूनें लढला. त्याच्या शिरच्छेदानंतर दुसऱ्या चार्ल्सबरोबर परदेशीं होता. दुसरा चार्ल्स गादीवर आल्यावर तोही इंग्लंडांत परत आला. व लॉर्ड चान्सेलर बनला. तो पक्का एपिस्कापेलिअन असून प्युरिटनांचा द्वेष्टा होता. त्याच्याच प्रेरणेनें क्लॅरेंडन कोड पास झालें. यामुळें तो बराच अप्रिय झाला. तो सदाचरणी असून चार्ल्सच्या विलासी वर्तनाचा त्याला तिटकारा वाटे. व तो चार्ल्सची कानउघाडणी करी. त्यामुळें तो चार्ल्सलाही अप्रिय झाला. डच युद्धांतील अपयशाचे खापर याच्या माथीं मारण्यात येऊन त्याच्यावर खटला करण्यात आला. पण तो फ्रान्समध्यें पळून गेला. तेथें त्यानें "सिव्हिल वॉर"ची हकीकत लिहिली. या पुस्तकाचें त्यानें "ग्रेट रिबेलियन्" ऊर्फ "मोठें बंड" असें नाव ठेविलें.

(३) **डॅनबी** :—(प्रश्न ७० पहा)

(४) शॅफ्ट्सबरी :—हा केवल प्रधान मंडळातील एक मंत्री होता. (अॅशले) तो मोठा मुत्सद्दी असून पार्लमेंटची अधिसत्ता व मत-स्वातंत्र्य याचा मोठा चहाता होता. याच उद्देशाने त्याने डिक्लेरेशन आफ् इंडल्जन्स जाहीर करण्यास चार्लसला भर दिली. यानंतर तो लॉर्ड चान्सेलर झाला. डोव्हरचा गुप्त तह त्याच्याशिवाय इतर चार केवल मंत्र्याना माहीत होता. या तहाची बातमी जेव्हा त्याला कळली, तेव्हापासून तो चार्लसचा विरोधक बनला व टेस्ट अॅक्टला त्याने पाठिंबा दिला. त्याने चार्लसनंतर जेम्सने गादीवर येऊ नये म्हणून एक्सक्ल्यूजन बिल पास होण्याकरिता आटोकाट प्रयत्न केला. १६८१ त चार्लसने त्याच्यावर राजद्रोहाचा आरोप ठेवला राय-हाऊस प्लॉट याच्याच प्रेरणेने झाला असे म्हणतात. तो हॉलंडमध्ये पळून गेला व तेथेच मृत्यू पावला. **त्याची मुख्य कामगिरी हेबिअस कॉर्पस अॅक्ट पास करणे** ही होय. याबद्दल याचे नाव लोकांच्या स्मरणात चिरकाल राहील.

८० Describe the character and aim of James II. What was the policy followed by him to achieve them ? How far did he succeed ? दुसऱ्या जेम्सचा स्वभाव व त्याचे उद्देश सांगा. हे उद्देश तडीस नेण्याकरिता त्याने कोणते धोरण स्वीकारले व त्याला कितपत यश आले त लिहा —जेम्स हा सरळ मनाचा माणूस होता. *त्याचे आत एक बाहेर एक असे दुसऱ्या* चार्लसच्यासारखे दुटप्पी वर्तन नव्हते. पण लोकांच्या भावना व आकांक्षा समजून घेण्याची पात्रता त्याच्या आंगीं नव्हती त्याच्या कल्पना फार कोत्या होत्या. त्याला आपल्या कर्तृत्वाची प्रौढी वाटत असून तो हेकेखोर व हट्टी होता. (७० ८१)—

चार्ल्सप्रमाणें कॅथोलिक पंथाची इंग्लंडांत पुन्हा प्राणप्रतिष्ठा करणें व अप्रतिबंध राज्य करणें हे त्याचे मुख्य उद्देश होते.

पण हे उद्देश साधण्याकरितां त्यानें अंगिकारलेलें धोरण शहाणपणाचें नव्हतें. परिस्थिती ओळखून त्याप्रमाणें वर्तन ठेवण्याचें भानाचें शहापण त्याच्यांत नव्हतें. त्यानें लोकविरोधाला न जुमानतां हट्टीपणानें बेजबाबदार कारभार सुरू केला. त्यामुळें त्याचे उद्देश साध्य झाले नाहींतच; पण उलट त्याला गादीला मुकावें लागलें.

**८१ दुसऱ्या जेम्सच्या बेकायदेशीर कृत्यांची थोडक्यांत माहिती द्या :—**

(१) डिक्लेरेशन ऑफ् इंडल्जन्स ऊर्फ मनरंजनीचा जाहीरनामा काढून त्यानें कॅथोलिक (व त्याजबरोबर नाइलाजास्तव प्युरिटन) लोकांना उपासनास्वातंत्र्य दिलें. कॅथोलिक लोकांविरुद्ध असलेले कडक कायदे शिथिल केले (२) टेस्ट ॲक्टकडे दुर्लक्ष्य करून कॅथोलिक लोकांना हुद्याच्या जागेवर नमण्याचा सपाटा चालविला. ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटींतील कॉलेजाचे मुख्य अधिकाऱ्याच्या जागेवर रोमन कॅथोलिकांच्या नेमणुका केल्या. ३) डिक्लेरेशन ऑफ इंडलजन्स हा जाहिरनामा सर्व भजनालयांतून वाचून दाखविण्याचा हुकूम सोडला. सात बिशपांनीं हा जाहीरनामा वाचण्याचें नाकारलें तेव्हां याची चौकशी करण्यांत आली. पण ते दोषमुक्त ठरले. (४) धार्मिक गोष्टींची चौकशी करण्याकरितां एक्लिझिॲस्टिकल कमिशन ऊर्फ धर्मप्रवर्तक मंडळ स्थापन केलें. पार्लमेंटच्या मदतीशिवाय राज्यकारभार चालविला.

**८२ दुसरा जेम्स अप्रिय होण्याचीं कारणें सांगा :—**

(१) मनमथच्या बंडाचा मोड करितांना जेम्स व त्याचे अधिकारी यांनीं जें क्रूरपणाचें वर्तन केलें त्यामुळें लोकमत त्याच्याविषयीं कलुषित झालें. [illegible]

( २ ) त्यानें कॅथोलिक पंथ पुन्हा इंग्लंडवर लादण्याचा प्रयत्न केला. अनेक बेकायदेशीर कृत्यें केलीं. ( ८३ पहा ) आणि पार्लमेंट शिवाय राज्यकारभार हाकण्याचा प्रयत्न केला.

८३ What led to the Revolution of 1688 ?
**इ० स० १६८८ सालीं झालेली राज्यक्रांती कोणत्या कारणामुळें झाली तें सांगा** —

( १ ) जेम्सचें धार्मिक धोरण, त्याने कॅथोलिक पंथाची पुनःस्थापना करण्याचा अट्टाहास धरल्यामुळे लोकमत क्षुब्ध झाले.

( २ ) कॅथोलिक ऑफिसर्सची नेमणूक केली व टेस्ट ॲक्ट धाब्यावर बसविला.

( ३ ) विश्वविद्यालयात जबरदस्तीनें कॅथोलिक लोकांचा शिरकाव करविला.

( ४ ) बेकायदेशीर डिक्लेरेशन ऑफ् इंडल्जन्स काढले व तें वाचण्याचें नाकारणाऱ्या सात बिशपावर खटला केला.

( ५ ) जेम्स हा वयस्क असून निपुत्रिक होता. तेव्हा ' तो मेल्यावर त्याची बहीण मेरी या प्रॉटेस्टंट राणीकडे राज्यकारभार जाईल व आपल्याला चांगले राजशासन मिळेल " या आशेवर लोकांनीं त्याचा जुलुम इतके दिवस सोसला. पण याच सुमारास जेम्सला मुलगा झाल्यामुळें व तो पुढे बापाच्या तालमेत व कॅथोलिक पंथातच वाढणार असल्यामुळें, लोकांची आशा निष्फळ झाली. तेव्हा सर्व पक्ष एकवटून त्यांनीं जेम्सचा जावई **तिसरा विल्यम प्रिन्स ऑफ ऑरेंज** याला पाचारण केलें

८४ How far was James II responsible for the Revolution of 1688 ? Trace its progress and results.
**दुसऱ्या जेम्सच्या कोणत्या कृत्यांमुळें १६८८ तील राज्य-**

**क्रांती घडून आली ? त्या बंडाची प्रगती कशी झाली व परिणाम काय झाले तें सांगा —**

( अ ) कारणें — प्रश्न ८१–८३ पहा

( ब ) दुसऱ्या जेम्सला मुलगा झाल्याबरोबर कॅथोलिक पक्षापासून मुक्त होण्याचा लोकांची आशा समूळ नष्ट झाली सर्व पक्षाचे लोक एक झाले व त्याच महीचे एक निमंत्रण पत्रक वुइल्यम् ऑफ ऑरेंज कडे पाठविण्यात आलें. विल्यमने ते निमंत्रण स्वीकारिलें व आपल्या १३००० सैन्यानिशी तो इंग्लंडच्या दक्षिण किनाऱ्यावर टॉर्बे येथें उतरला. तेव्हां जेम्सचे धाबे दणाणलें व त्यानें बेमर्यादशीर कृत्याचे परिमार्जन करून चांगल्या रीतीने वागण्याचें अभिवचन दिलें पण त्याच्यावर विश्वास ठेवून त्याला कांणीही मदत करण्यास पुढें सरसावला नाहीं आपणाला कोणीच मित्र उरला नाहीं असे पाहून तो फ्रान्समध्ये पळून गेला नंतर पार्लमेंटने त्याला किंवा इतर कोणत्याही कॅथोलिक राजाला गादी देऊ नये असा ठराव करून विल्यम व मेरी याना गादीवर बसविलें या क्रांतीत रक्तपात मुळीच न झाल्यामुळे तिला "रक्तशून्य क्रान्ती" ( Bloodless Revolution ) असें म्हणतात.

( क ) परिणाम -- पार्लमेंट व राजा यामधील लढा संपला. "राज्यपद ईश्वरदत्त आहे" या सिद्धांताला चांगलाच धक्का बसला व प्रजेची राजसत्तेला नियंत्रण घालण्याची सत्ता प्रस्थापित केली गेली. राजाने प्रजेच्या हक्काची पायमल्ली न करता तिच्या सल्ल्यानेंच राज्यकारभार चालविला पाहिजे ही गोष्ट सर्वमान्य झाली सर्व सत्ता लोकांच्या हातीं असून राजा हा फक्त तिची अमलबजावणी करणारा मुख्य अधिकारी ( Chief executive officer ) होय ही गोष्ट सिद्ध झाली सर्व सूत्रे पार्लमेंटच्या हातीं आलीं म्युटिनी ॲक्टाअन्वयें तर ( प्रश्न ८७ पहा ) खडे सैन्य सुद्धा पार्लमेंटच्या ताब्यात गेलें.

न्यायाधीश राजाच्या दडपणापासून स्वतंत्र झाल्यामुळें. त्याचे निकाल राजाला अनुकूल व एकतर्फी न रहाता न्यायाची अमलबजावणी निःपक्षपातीपणें होऊं लागली.

८५ What important changes were brought about by the Revolution of 1688 in the British Constitution ? **इ. स. १६८८ तील राज्यक्रांतीमुळें ब्रिटिश राज्यकारभाराच्या रचनेंत कोणते फेरफार घडून आले ते सांगा:-** वास्तविक पहाता ही राज्यक्रांती ह्मणजे कांहीं खरे बंड नव्हतें (प्रश्न ८६ पहा); ह्मणून राज्यकारभाराच्या रचनेंत काही विशेष असे फरक घडून आले नाहींत. बिल् ऑफ् राइट्स्नें कांहीं नवीन हक्क मिळाले नाहींत. फक्त जुनेच हक्क पुन्हा जोरदार रीतीने पुढें मांडून त्याना पार्लमेंटनें चिरस्थायि व प्राप्त करून घेतलें. (१) राजाला फक्त एक वर्षापुरताच पैशाचा पुरवठा करण्याचें ठरल्यामुळें राजाला पार्लमेंटवर पैशाकरितां अवलंबून रहावें लागूं लागलें. (२) म्युटिनी ॲक्टान्वयें खडें सैन्य पार्लमेंटच्या हातात गेलें. (३) मुख्य गोष्ट ह्मणजे पार्लमेंटचें सत्ताधीशत्व सिद्ध होऊन इतःपर राजानें त्या सभेच्या सल्लयानें चाललेंच पाहिजे ही गोष्ट निराबाधपणें सिद्ध झाली. या नंतरच्या राजांनीं ही गोष्ट नाकारण्याचें धाडस कधीं केलें नाहीं.

८६ "The Revolution of 1688 was not a revolution in the true sense of the word It was a mere passage of authority from one king to another." Examine the statement. **"वास्तविक पहातां १६८८ सालीं कांहीं मोठीशी क्रांती घडून आली नाहीं. फक्त एक राजा जाऊन त्याच्या जागीं दुसरा राजा आला."** या विधानाची सत्यता दाखवा:—हें विधान बहुतेक अंशीं सत्याला धरून आहे. जेम्स पदच्युत होऊन विल्यम गादीवर आला. राजा

बदलला पण इतर राजकीय घटनेंत कांहींचे फरक घडून आले नाहीं. या वेळेपासून पार्लमेंटचे सत्ताधीशत्व निराबाधपणें स्थापित गेलें. ही गोष्ट खरी पण ही सत्ता नवीन नव्हती फक्त ही सत्ता पूर्वी धाब्यावर बसविली जात होती. तसें करणें यापुढें अशक्य झालें व असें होण्याला तीन गोष्टी कारण झाल्या. (१) राजसत्ता ईश्वरदत्त व वंशपरंपरागत नसून पार्लमेंटच्या मर्जीवर अवलंबून आहे असें सिद्ध झालें. (२) पार्लमेंटनें पैसा व सैन्य या बाबी आपल्या ताब्यांत घेतल्या. (३) न्यायाधीश राजनियंत्रणातून मुक्त होऊन पार्लमेंटला जबाबदार झाले.

**८७ Write short notes on --मनमथचें बंड, ब्लडी असाइझ्, डिक्लेरेशन ऑफ राइट्स्, बिल ऑफ राइट्स् व म्युटिनी ॲक्ट.**

(१) **ड्यूक ऑफ् मनमथचें बंड** --मनमथ हा दुसऱ्या चार्ल्सचा दासीपुत्र होता. तो प्रॉटेस्टंट पंथीय असून व्हिग पक्षाचा त्याला पाठिंबा होता. चार्ल्सनंतर त्यालाच गादीवर आणण्याच्या उद्देशानें शॅफ्ट्स्बरीनें एक्सक्ल्यूजन बिल पुढें आणलें होतें दुसरा जेम्स गादीवर आल्यावर, प्रॉटेस्टंट लोकांचें आपल्याला पाठबळ मिळेल या आशेवर मनमथनें बंड उभारलें त्याला शेतकरी वर्गांत पुष्कळ सहाय्यक मिळाले. परंतु सरदार व जमीनदार यापैकीं कोणीही त्याच्या मदतीला गेले नाहींत. सेजमूर येथें त्याचा जेम्सच्या सैन्यानें पूर्ण पराभव केला. (१६८५) व लौकरच त्याला पकडण्यात येऊन फाशीची शिक्षा देण्यात आली.

(२) **ब्लडी असाइझ्** ( Bloody Assize )—मनमथला फाशीं दिल्यावर या बंडात ज्या ज्या लोकांनीं प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें मदत केली त्याची चौकशी करून त्यांना शिक्षा देण्याकरितां जेफ्रिझ नावाच्या न्यायाधिशाची नेमणूक करण्यात आली. हा न्याय-

धोरा इतक्या निर्दयपणें वागला कीं त्याच्या या फिरतीच्या अदालतीस "ब्लडी असाइझ्" अथवा "खुनी अदालत" असें नाव पडलें. जेफ्रिझनें चौकशीचा नुसता फार्स करून ३०० जणास फांशीं दिलें. कैक लोकांस फटक्याचा व तुरुंगाची शिक्षा होऊन पुष्कळांना गुलाम ह्मणून वस्ट इंडिजमध्ये पाठविण्यात आलें

(३) **डिक्लेरेशन ऑफ् राइट्स्:** जेम्सच्या अनेक जुल्मी कृत्यांना कंटाळून नियमित चालविण्याचे ठरल्यावर पार्लमेंटरी पुढाऱ्यांनीं एक मसुदा तयार करून राष्ट्राच्या हक्काचा यांत स्पष्ट खुलासा केला होता या मसुद्याला "डिक्लेरेशन ऑफ राइट्स्" ह्मणजे "रयतेच्या हक्काचा खुलासा" असें नाव आहे यांत खालील कलमें मुख्य होतीं (१) पार्लमेंटच्या संमतीशिवाय नवीन कायदे पास करण्याचा किंवा जुने कायदे कायमचे किंवा तात्पुरते रद्द करण्याचा राजाला अधिकार नाहीं. (२) पार्लमेंटच्या संमतीशिवाय राजानें खडी फौज ठेवू नये. (३) पार्लमेंटच्या संमतीशिवाय प्रजेपासून कोणताही कर घेऊं नये. (४) स्टारचेंबर, हायकमिशन, एक्लिझिआस्टिकल कोर्ट वगैरे सारखीं कोर्टें स्थापन करूं नये. (५) योग्य वाटतील त्या लोकांस निवडून देण्याचा लोकांना पूर्ण हक्क आहे, (६) पार्लमेंटरी सभासदांना मोकळेपणीं वादविवाद करण्याचा पूर्ण हक्क आहे. (७) वुइलियम आणि मेरी यांनी गादीवर बसावें वगैरे वगैरे

(४) **बिल ऑफ राइट्स्**—वुइलियमनें डिक्लेरेशन ऑफ **राइट्स** " या खर्डिल्याला संमती दिली. पण हा मसुदा कन्व्हेनशन (तात्पुरत्या) पार्लमेंटनें केला असल्यामुळे त्याला कायद्याचें स्वरूप आलें नाहीं. वुइलियमच्या राज्यारोहणानंतर आलेल्या पार्लमेंटनें तो खरडा पास केला व अशा रीतीनें त्याला कायदेशीर स्वरूप प्राप्त झाल्यावर तो "**बिल ऑफ राइट्स्**" या नांवानें प्रख्यात झाला.

(५) म्युटिनी ॲक्ट्—हा कायदा १६८९ मध्यें पास करण्यात आला. देशाच्या सरक्षणासाठीं फौजेची जरूर असते. पण ती राजाच्या ताब्यात दिल्यास राजा तिचा दुरुपयोग करतो असें आढळून आल्यामुळे हा कायदा पास करण्यात आला व या कायद्यान्वयें फौज ठेवण्याविषयीं मजुरी एक वर्षापुरतीच द्यावी असे ठरविण्यात आले. तेव्हापासून हा कायदा दरवर्षी पास करून घ्यावा लागतो. त्याकरिता दरवर्षी पार्लमेंटची बैठक बोलवावी लागते. या कायद्यामुळे खड्या सैन्याचा ताबा पार्लमेंटकडे आला.

**८८ (अ) डिक्लेरेशन ऑफ् राइट्स् म्हणजे काय? (ब) डिक्लेरेशन ऑफ राइट्स्, बिल ऑफ् राइट्स् आणि पिटिशन ऑफ् राइट्स् यांमध्ये फरक काय?**

(अ) प्रश्न ८७ --(३) पहा.

(ब) "डिक्लेरेशन ऑफ राइट्स्" हा कच्चा खरडा होता हा मसुदा तात्पुरत्या पार्लमेंटने केला होता. त्यालाच कायदेशीर पार्लमेंटने संमती दिल्यावर तो बिल ऑफ् राइट्स् या नावानें प्रख्यात झाला. पिटिशन ऑफ राइट्स हा कायदा अगदींच निराळा असून, तो पहिल्या चार्लसच्या कारकीर्दीत पास झाला होता व बिल् ऑफ राइट्स हा कायदा तिसऱ्या विल्यमच्या कारकीर्दीत झाला.

**८९ 'म्युटिनी ॲक्ट" विषयीं तुम्हांस काय माहिती आहे? त्याचीं कारणें व महत्व सांगा? (प्रश्न ८५–८७ पहा)**

**९० वुइलियमच्या कारकीर्दीतील इंग्लंडच्या गादीवरील वारसहक्काविषयींच्या युद्धाविषयीं तुम्हांस काय माहिती आहे?**

वुइलियमच्या इंग्लिश जनतेनें गादीवर बसविल्यानंतर पळून गेलेल्या दुसऱ्या जेम्सने लुईच्या मदतीने आपली गादी परत मिळविण्याकरिता पुष्कळ खटपट केली. त्याला स्कॉटलंड व आयर्लंड येथें बरेंच पाट-

बळ मिळालें व या दोन देशात बुइलियमच्या विरुद्ध दोन बंडे झालीं. पण जेम्सला कोठेंही यश न येता फ्रान्समध्यें परत जावें लागलें. ( या बंडाची हकीगत ९१–९२ प्रश्नात पहा. )

९१ **तिसऱ्या विल्यमच्या कारकीर्दीतील स्कॉटलंडमधील युद्धाची हकीगत द्या:**—स्कॉटलंडमध्यें काहीं सरदार स्टुअर्ट घराण्याचे पक्षपाती असल्यामुळें त्यानीं तिसऱ्या विल्यमविरुद्ध "**जान् ग्रॅहॅम्**" उर्फ "**व्हायकाउंट डंडी**" याच्या नेतृत्वाखालीं बंडाचें निशाण उभारलें व **किलिक्रॅन्कीच्या** घाटात विल्यमचा सेनापती **मॅकी** याचा धुव्वा उडविला. परंतु स्वत डंडी मारला गेल्यामुळें बंडखोराना नेता उरला नाहीं. त्यामुळें त्याचें अवसान नष्ट होऊन त्यानीं पळ काढला.

९२ **तिसऱ्या विल्यमच्या कारकीर्दीतील आयर्लंडांतील युद्धाची हकीकत द्या:**—फ्रेंच सैन्याची कुमक घेऊन स्वत जेम्स आयर्लंडमध्यें आल्यामुळें तेथील युद्ध जास्त वेळ टिकलें आयरिश जनता कॅथोलिक असल्यामुळें तिने जेम्सला ताबडतोब मदत केली. **लंडन डेरी व एनिस्किलन** या दोन शहराशिवाय सर्व आयर्लंड जेम्सच्या ताब्यात गेलें प्रॉटेस्टंट पथीय लोकानीं या शहराचा आश्रय केला. जेम्सनें या शहराना वेढा दिला. हा वेढा इतिहासात "**सीज ऑफ् लंडनडेरी**" या नावानें प्रख्यात आहे.

हा वेढा १०० हून अधिक दिवस टिकला. अखेरीस त्याना बाहेरील कुमक मिळाली व तेथील लोकानीं **न्यूटन् बटलर** येथें जेम्सच्या सैन्याचा पराभव केला. याचवेळीं स्वत बुइलियम आयर्लंडमध्यें सैन्यासह आला आणि त्यानें जेम्सचा **बॉईन** व **अंथलोन** येथें पराभव केला. तेव्हा आयरिश लोकानीं **लिमरिकच्या तहावर** (**पॅसफिकेशन ऑफ् लिमरिकवर**) सह्या केल्यावर युद्ध सपलें. ह्या तहाच्या

अटी येणेंप्रमाणें — ( १ ) आयरिश लोकानी विल्यमला राजा म्हणून कबूल करावें ( २ , कॅथोलिक लोकाना धार्मिक सवलती द्याव्या व शरण आलेल्याना त्याच्या जमिनी परत देण्यात याव्या.

पण दुर्दैवानें एका प्रॉटेस्टटपथीय मडळाच्या हातात सर्व कारभार गेला व त्यानें कॅथोलिकाना फारच निष्ठुरतेनें वागविलें व त्याचा छळ केला

**९३ तिसऱ्या विल्यमच्या कारकीर्दींतील फ्रेंच युद्धाचीं कारणें, मगती व परिणाम लिहा:—**

( अ ) कारणें —चवथ्या लुईनें जेम्सला मदत केल्यामुळें इग्लिश जनता त्याच्यावर खवळली तिसरा विल्यम याच सधीची वाट पहात होता. कारण तो लुईचा कट्टा दुष्मन होता. इंग्लडची आपल्याला फ्रान्स विरुद्ध मदत होईल एवढ्याच आशेनें त्याने इग्लडची गादी पत्करली होती

( ब ) **मगती:**—हें युद्ध १६९० मध्यें पुकारण्यात आलें लुईच्या मदतीनें जेम्स आयर्लंडात उतरला पण त्याचा पराभव झाला ( ९२ पहा ) समुद्रावर फ्रेंच आरमारानें डच आरमाराचा "**बीची हेड**" येथ पराभव केला त्यावेळी फ्रेंच आरमार **ॲडमिरल टरव्हाईन** या कसलेल्या अधिकाऱ्याच्या नेतृत्वाखालीं होतें. लुईनें विल्यमचा **स्टेनकर्क** येथें पराभव केला व **नामूरचा** बळकट किल्ला घेतला ( १६९२ ) पण इग्लिश **ॲडमिरल रसेल** यानें **ला होग** येथे फ्रेंच आरमाराचा नाश केला व विल्यमनें नामूरचा किल्ला परत घेतला ( १६८५ ) अखेरीस दोन्ही राष्ट्रें युद्धाला कटाळल्यामुळें **रिस्विक** येथें एक तह करण्यात येऊन हें युद्ध सपलें ( १६९७ )

**रिस्विकच्या तहाचीं कलमें:**— ( १ ) एकमेकाची जिंकलेली

ठिकाणे परत देण्यात यावी. ( २ ) लुईनें विल्यम हा इंग्लंडचा राजा असल्याचें कबूल करावें व जेम्सचा पक्ष सोडावा. ( ३ ) विल्यमनें फ्रेंच प्रॉटेस्टंटाना मदत करू नये.

( क ) परिणाम – इंग्लंडचें राज्य पुन्हा परत मिळण्याची जेम्सची आशा नष्ट झाली. लुईच्या वाढत्या सत्तेला थोडासा खो बसून युरोपची फ्रेंचाच्या भीतिपासून कांहीं काळपर्यंत तरी सुटका झाली.

९४ What was the main object of William's life? What efforts did he put forth to achieve it? How far did he succeed? **विल्यमचा जीवितहेतु काय होता? तो साधण्याकरितां त्यानें कोणते प्रयत्न केले? व त्यात त्याला कितपत यश आलें तें लिहा:-**

चवदाव्या लुईच्या नेतृत्वाखालीं फ्रान्सदेश, सर्व युरोपखंड आपल्या कह्यात आणू इच्छित होता. या वाढत्या फ्रेंच सत्तेला पायबंद घालणें हे विल्यमचे इति कर्तव्य होतें. या उद्देशानें त्यानें फ्रान्सविरुद्ध अनेक वेळां अनेक राष्ट्रसंघ निर्माण केले. स्पॅनिश सक्सेशनचा प्रश्न उपस्थित झाला त्यावेळीं स्पेनचें विस्तृत साम्राज्य एकाद्या फ्रेंच राजपुत्राच्या ताब्यात जाऊ नये ह्मणून त्यानें पार्टिशन ट्रीटी घडवून आणिली. पण स्पेनचा राजा वारल्यावर त्याच्या मृत्युपत्राप्रमाणें सर्व साम्राज्य लुईचा नातु फिलिप ऑफ अँजु याजकडे आलें. तव्हा फ्रान्स व स्पेन हीं दोन प्रबळ राष्ट्रें अशा रीतीनें एक झाल्यास युरोपला धोका आहे असें विल्यमला वाटलें व त्यानें फ्रान्सविरुद्ध इंग्लंड, हॉलंड व ऑस्ट्रिया यांचा एक संघ घडवून आणिला व लवकरच फ्रान्सविरुद्ध युद्ध सुरू करण्यात आलें. पण आपल्या उद्देशाची पूर्तता पहाण्यास विल्यम जगला नाहीं.

९५ Describe William III's attempt to maintain

balance of power in Europe युरोपांत " बलसमत्व " रहावें एतदर्थ तिसऱ्या विल्यमनें कोणते प्रयत्न केले ते सांगाः—
प्रश्न ९४ पहा

९६ Describe William III's Government and Home & Foreign policy तिसऱ्या विल्यमच्या राज्यकारभाराची व अंतःस्थ आणि परराष्ट्रीय धोरणाची माहिती द्याः—
पार्लमेंटनें वुइल्यिमला गादी दिली. पण त्याच्याबद्दल इंग्लिश जनतेचें मन साशंक असून त्याच्याबद्दल तिला कधींही आपलेपणा वाटला नाहीं. त्याच्याशीं राजनिष्ठेची शपथ घेतली असून दखील रसेल व चर्चिल सारख्या लोकांनीं जेम्सजवळ गुप्त कारस्थानें करण्यास मागें पुढें पाहिलं नाहीं. तो उपटसुंभासारखा गादीवर बसला असें टोरी लोकांस वाटत होतें व टोरी लोकांचा त्यानें सूड घेतला नाहीं म्हणून व्हिग लोक असंतुष्ट होते. इंग्लंडांतील कारभारापेक्षा युरोपमधील घडामोडींकडे तो अधिक लक्ष पुरवितो असें पार्लमेंटला वाटत असून त्याच्या परराष्ट्रीय धोरणाला पाठिंबा देण्यास तें उत्सुक नव्हतें. त्याचीं धार्मिक मतें कॅल्व्हिनिस्ट पंथाचीं असून त्याचा सरलतेच्या धोरणाकडे कल होता. त्यामुळें तो एपिस्कोपेलिअन धर्माधिकाऱ्यांना प्रिय झाला नाहीं. तो मतस्वातंत्र्याचा भोक्ता होता. फ्रान्सविरुद्ध इतर राष्ट्रांचा संघ घडवून आणून फ्रेंच सत्तेला आळा घालणें हें त्याच्या परराष्ट्रीय धोरणाचें सार होतें.

९७ Write short notes on:—(१) ॲक्ट ऑफ् सेट्लमेंट (२) टॉलेरेशन ॲक्ट (३) ग्लेंको येथील कत्तल (४) पॅसिफिकेशन ऑफ लिमरिक (५) लंडनडेरी येथील वेढा (६) रिस्विकचा तह (७) दुसरा ट्रायनिअल ॲक्ट.

(१) हा कायदा वुइल्यमच्या कारकीर्दीत १७०१ मध्ये पास

करण्यात आला. वुइल्यम व मेरी याना मूल नसल्यामुळें गादी अॅनकडे जावी असें ठरलें होतें. पण तिला मूल नसल्यामुळें तिच्या नतरची गादीची व्यवस्था करून ठेवणें जरूर होतें (१) अॅननतर स्टुअर्ट घराण्यातील प्रॉटेस्टट वारस सोफिया व तिचे वारस (सोफियेचें हॅनोव्हरच्या सस्थानिकाशीं लग्न झालें होतें स्टुअर्ट वशवृक्ष पहा.) याना इग्लडच्या गादीवर बसवावे. (२) राज्यकर्त्यानें ग्रेट ब्रिटनच्या बाहेर जाऊ नये (३) राज्यकर्त्याच्या इग्लडबाहेरील इस्टेटीसबधींच्या कलहात त्यानें इग्लडला भाग घ्यावयास लावू नये. अशीं ह्या कायद्यात कलमें होतीं.

(२) "टॉलरेशन अॅक्ट" ऊर्फ "सवलतीचा कायदा" हा १६८९ मध्यें पास झाला "नॉन्कन्फर्मिस्ट" किंवा "डिसेन्टर्सना" धार्मिक सवलता देण्याच्या हेतूनें हा कायदा आणला गेला. या कायद्यानें डिसेन्टर्सना थोडेसें उपासनास्वातत्र्य मिळालें. पण कॅथालिकाना मात्र हें स्वातत्र्य देण्यात आलें नाहीं. पण धार्मिक बाबतींत समदृष्टीच्या धोरणाला या कायद्यापासून सुरवात झाली असल्यामुळें हा कायदा महत्वाचा आहे (३) **ग्लेंको येथील कत्तल** — स्कॉटलडमधील बडाचा मोड झाल्यावर ३१ डिसेंबर १६९१ च्या आत जे वुइल्यम व मेरीशीं राजनिष्ठ राहण्याची शपथ घेतील, त्याना क्षमा करण्यात येईल असें विल्यमनें जाहीर केलें तव्हा ग्लेंको येथील मॅक्डोनल्ड् घराण्याशिवाय इतर सर्व पुढाऱ्यानीं शपथा घेतल्या तेव्हा त्या घराण्याचा शत्रु **मास्टर ऑफ स्टअर** यानें मॅक्डोनल्ड जातीची कत्तल करण्याचा हुकुम विल्यमकडून मिळविला व विश्वासघात करून अतिशय नीचपणें मॅक्डोनल्ड घराण्याची कत्तल केली. या गोष्टीत विल्यमचें प्रत्यक्ष अग नव्हते. पण खरी हकीकत कळल्यानतरी देखील विल्यमनें अपराध्यास योग्य शासन केलें नाहीं म्हणून त्याजकडे दोष येतो.

(He was a party to the deed after the act)

(४) प्रश्न ९२ पहा.

(५) **लंडनडेरी येथील वेढा** (Siege of Londonderry),--

सर्व आयर्लंड जेम्सच्या ताब्यात गेल्यानंतर आयरिश प्रॉटेस्टटांनीं या शहराचा आश्रय केला. जेम्सनें शहराला वेढा दिला. पण आतील लोकांनीं फारच धैर्यानें तोंड दिलें. वेढा शंभराहून जास्त दिवस टिकला. जमिनीच्या व समुद्राच्या बाजूनेंही हा वेढा पडला होता. आतील अन्नसामुग्री सपली व लोकांचे अतिशय हाल झाले. नदींतून जहाजें येऊन आतील लोकांस कुमक मिळू नये ह्मणून जेम्सच्या सेन्यानें नदीच्या पात्रात बाध घातला होता. शेवटीं "**डार्ट माऊथ**" नावाच्या एका इंग्लिश गलबतानें तो बाध तोडला व शहराला कुमक पोहोंचविली. मग शहरातील लोक शत्रूंवर तावडतोब तुटून पडले व त्याचा त्यानीं **न्यूटन बटलर** येथे पराभव केला.

(६) **रिस्विकचा तह** (Treaty of Riswick)

प्रश्न ९३ पहा

(७) **दुसरा ट्रीएनिअल ॲक्ट (त्रैवार्षिक कायदा)**--हा कायदा १६९४ मध्यें पास करण्यात आला. या कायद्यान्वयें दर तीन वर्षानीं पार्लमेंटची नवीन निवडणूक करावी असें ठरलें.

९८ Give the causes that led to the war of Spanish succession ? स्पॅनिश वारसा हक्कासंबंधींच्या युद्धाचीं कारणें द्या: --स्पेनचा राजा दुसरा चार्लस याला मूल नव्हतें. तो अत्यंत अशक्त व दुखणेकरी असल्यामुळें केव्हा मरेल याचा नेम नव्हता. त्याच्या पश्चात् फ्रान्स व ऑस्ट्रिया येथील राजकर्त्यांचा स्पेनच्या गादीवर सारखाच हक्क पोहोंचत असल्यामुळें हा प्रश्न गुंतागुंतीचा झाला,

होता. तेव्हा ऑस्ट्रिअन बादशहा लीओपोल्ड, हाॅलंड व इंग्लंडचा राजा तिसरा विल्यम व फ्रान्सचा बादशहा तिसरा लुई यांच्या एक विचारानें एक योजना तयार करण्यात आली. या योजनेला "पार्टिशन ट्रीटी" (विभागणीचा तह) असें ह्मणतात. स्पेन, नेदरलंड व वेस्ट इंडीज हे प्रदेश ऑस्ट्रियाच्या आर्चडयूकला मिळावे, व नेपल्स, सिसिली आणि मिलन हे प्रदेश लुईच्या धाकट्या मुलास देण्यात यावे असें ठरलें. पण चार्लसनें मरताना मृत्युपत्र तयार करून सर्व साम्राज्य लुईचा नातु फिलीप यास देण्यात यावे अशी योजना केली होती. लुईनें आपला नातु फिलीप हा स्पेनचा राजा झाल्याचें जाहीर केलें त्यामुळें विल्यम व लिओपोल्ड हे त्याच्या विरुद्ध झाले. पण यावेळी ब्रिटिश पार्लमेंट युद्धाला मुळींच तयार नव्हतें. पण लुईनें यावेळीं रिस्विकचा तह मोडून हॉलंडच्या सरहद्दींतील कांहीं किल्ले जिंकले व दुसऱ्या जेम्सच्या मरणानंतर त्याच्या मुलाला इंग्लंडचा राजा ह्मणून मान्य केलें. यामुळें इंग्लिश जनता लुईविरुद्ध चिडली व युद्धाला तोंड लागलें.

९९ Describe the events in the war of Spanish succession. **स्पॅनिश सक्सेशनच्या युद्धांत घडलेल्या गोष्टींची थोडक्यात माहिती.** उ०—या युद्धांत इंग्लंड, हॉलंड, प्रशिया, ऑस्ट्रिया आणि पोर्तुगाल हीं राष्ट्रें एका बाजूस असून, फ्रान्स, स्पेन व बव्हेरिया हीं राष्ट्रें दुसऱ्या बाजूस होतीं. फ्रेंचांनीं आस्ट्रियावर स्वारी केली. पण डयूक ऑफ मार्लबरोनें त्याचा **ब्लेनहिमच्या** घनघोर लढाईत पूर्ण पराभव केला. यानंतर **रॅमिलीज्**, ( Ramillies ) **औडिनार्ड**,( Oudenarde ) व **माल्प्लाके** ( Malplaquet ) येथें फ्रेंचांचा पूर्ण पराभव झाला. समुद्रावरही फ्रेंचांचा पूर्ण पराभव होऊन **ॲडमिरल रूक** यानें छापा घालून **जिब्राल्टर** हें महत्वाचें

ठिकाण सर केलें. या सुमारास मार्लबरोला पाठिंबा देणारा व्हिगपक्ष प्रजेचे मनातून उतरला व टोरीपक्ष अधिकारारूढ झाला. या पक्षानें मार्लबरोला परत बोलावून **ड्यूक ऑफ ऑर्मंड** याला सेनापती नेमिलें. शेवटीं १७१३ मध्यें **युट्रेक्टच्या** तहावर सह्या होऊन युद्धाची परिसमाप्ति झाली. तहाचीं कलमें:-( १ ) फिलिपला स्पेनची गादी देण्यात आली, पण त्याचा फ्रान्सच्या गादीवरील हक्क नष्ट झाला. ( २ ) ऑस्ट्रियाच्या राजाला इटली, नेपल्स आणि नेदर्लंड हे प्रदेश मिळाले. ( ३ ) लुईनें वुइल्यम व ॲन् हे इग्लडचे कायदेशीर राज्यकर्ते असल्याचें कबूल करून ॲन् नतर हॅनोव्हर घराण्याकडे राज्यपद जावें या गोष्टीला मान्यता दिली. ( ४ ) इग्लडला नोवा-स्कोशिया, न्यू फाउडलड, जिब्राल्टर आणि मिनॉर्का हे प्रदेश मिळाले. ( ५ ) स्पेनच्या अमेरिकन वसाहतींना गुलाम पुरविण्याचा पूर्ण मक्ता इग्लडला मिळून दरवर्षी मालानें भरलेलें एक जहाज पोर्टोवलो या ठिकाणीं पाठविण्याची परवानगी इग्लडला मिळाली ( ॲसिएटोचा करार. )

**१०० स्पॅनिश सक्सेशनच्या युद्धांत इंग्लंड कोणत्या उद्देशानें पडलें व तो हेतु किनपत सिद्धीला गेला तें सांगा –**

स्पॅनिश वारसाच्या वाबतींत जें युद्ध झालें त्यात युरोपमध्यें "बल समत्व" राखणें हाच इग्लडचा मुख्य हेतु होता कारण जर फ्रान्स व स्पेन हीं राष्ट्रें एका अंमलाखालीं आलीं तर युरोपातील इतर राष्ट्रांना धोका पोहोंचण्याचा संभव होता. या युद्धामुळे लुईची मानखडना झाली व फ्रान्सच्या वाढत्या सत्तेला पायबंद बसला व फ्रान्स आणि स्पेन हीं दोन राष्ट्रें एका अमलाखालीं येण्याचे टळले अशा रातीनें इंग्लडचा उद्देश पूर्णपणें फलद्रूप झाला.

**१०१ इंग्लंड व स्कॉटलंड यांचीं पार्लमेंटें एकत्रित होण्यास**

**त्या गोष्टी कारणीभूत झाल्या त्या देऊन त्यांचें ऐक्य कोणत्या अटींवर झालें, व या एकीचे परिणाम काय झाले ते सांगा —**

(अ) एलिझबेथनतर स्कॉटलडचा राजा जेम्स हा इग्लडच्या गादीवर आल्यामुळे ते दोन देश एकाच राजाच्या अमलाखालीं आले पण या दोन देशाचीं पार्लमेंटे निरनिराळीं असून तीं आपआपल्या देशापुरते कायदेकानू करीत असत. त्यामुळें व्यापारविषयक बखेडे होण्याचे प्रसग वारंवार येत असत स्कॉटलड देशात दरिद्रता फार असल्यामुळें डरायन स्कीम ( Darian scheme ) या नावाची एक योजना तयार करण्यात आली. पण ती यशस्वी न झाल्यामुळें स्कॉटलडात असतोष माजला व या अपयशाचें खापर स्कॉटिश लोकांनीं इग्लिश लोकांच्या माथीं फोडलें. ॲनच्या कारकीर्दींत हा तटा विकोपास जाऊन स्कॉटिश पार्लमेंटनें **" ॲक्ट ऑफ सिक्युरिटी "** या नावाचा कायदा पास केला. " ॲन नतर इग्लंडच्या राज्यकर्त्याला स्कॉटलडची गादी द्यावयाची कीं नाहीं हें ठरविण्याचा अधिकार स्कॉटिश पार्लमेंटला आहे " असा या कायद्याचा आशय होता. तेव्हा हीं दोन राष्ट्रें अलग झाल्यास घरात शत्रु असल्याप्रमाणें इग्लडची स्थिती होईल. व अंतःस्थ युद्ध उद्भवेल म्हणून १७०७ सालीं **" ॲक्ट ऑफ् युनिअन "** अथवा **" एकीकरणाचा कायदा "** पास केला गेला.

(ब) या कायद्याचीं मुख्य कलमे येणेंप्रमाणें —

(१) इग्लड व स्कॉटलड मिळून एक राज्य समजण्यात यावें व त्याचें एकच पार्लमेंट असावें

(२) स्कॉटलडनें हॉऊस ऑफ कॉमन्समध्यें ४५ सभासद व हॉऊस ऑफ लॉर्डस्मध्यें १६ सभासद पाठवावे.

(३) स्कॉच लोकाना व्यापाराच्या बाबतींत इग्लिशाच्या बरोबरीनें अधिकार असावेत.

(४) न्यायकोर्टे व धर्मालयें या बाबतीत स्कॉटलंडात तेथील पूर्वीचेच धोरण कायम रहावें.

(क) परिणाम —या एकीचे परिणाम फार महत्वाचे व चिरकालिक स्वरुपाचे आहेत. पुरातन काळापासून इंग्लंड व स्कॉटलंड याचा सदैव झगडा असे व इंग्लंडचा शत्रु फ्रान्स याजबरोबर स्कॉटलंडचें सख्य असे. त्यामुळें घरात शत्रु असल्यासारखी इंग्लंडची स्थिती झाली होती. व त्याच्या प्रगतीला ही मोठीच आडकाठी होती. या एकीमुळें ही स्थिती पालटली. दोन्ही राष्ट्रांचें एक संघटित राष्ट्र झालें व दोघाचीही भरभराट होत गेली.

१०२ "Without this union, England would never have become a great European power" Justify the statement. **य एकीखेरीज इंग्लंड हें युरोपखंडांत बलाढ्य राष्ट्र कधीच झालें नसतें." या विधानाची सत्यता सिद्ध कराः—**

प्रश्न १०१ (क) पहा.

**१०३ इंग्लंड व स्कॉटलंड यांच्या पार्लमेंटाचें एकीकरण दोनही देशाना कसें फायदेशीर झालें तें सांगा —**

प्रश्न १०१ क पहा.

१०४ Write short notes on —**(१) डरायन स्कीम** (Darian Scheme) **(२) व अॅक्ट ऑफ सिक्युरिटी** (Act of Security)

(१) स्कॉटलंडात दारिद्य वाढल्यामुळें सर्वत्र असंतोष माजला होता. तेव्हा स्कॉटलंडमध्यें एक कंपनी स्थापन करण्यात येऊन पनामाच्या संयोगभूमीजवळ **डरायन** नावाची वसाहत स्थापण्याचें ठरविण्यात आलें. या योजनेला "**डरायन स्कीम**" असें ह्मणतात. इंग्लिश लोकांनी या योजनेला पाठबळ देण्याचें नाकारलें. स्कॉटिश

लोकांनीं स्वतःच्या हिंमतीवरच ही योजना पुरी करण्याचें ठरविलें. पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं व या अपयशाचें खापर इंग्लंडच्या माथीं मारण्यात आलें.

( २ ) **ॲक्ट ऑफ् सिक्युरिटीः**— प्रश्न १०१ पहा.

**१०५ मार्लबरोचें चरित्र रेखाटून त्याच्या स्वभावाचें वर्णन कराः**—जॉन् चर्चिल, डयूक ऑफ मार्लबरो, याचा जन्म १६५० त झाला .तो आपल्या वयाच्या सोळाव्या वर्षीं सैन्यात दाखल झाला. राज्यक्रांतीच्या वेळीं तो वुइल्यमच्या पक्षाला मिळाला. वुइल्यमनें त्याला मार्लबरोचा अर्ल केलें. परंतु पुढें त्याचें वुइल्यमशीं न पटून त्यानें जेम्सबरोबर कारस्थानें सुरू केल्यामुळें त्याला हुद्यावरून बडतर्फ करण्यात आलें. परंतु पुन्हां राजाची मर्जी त्याच्यावर प्रसन्न होऊन स्पॅनिश सक्सेशनच्या युद्वात त्याला सेनापती नेमण्यात आलें. ॲन राणीची त्याच्यावर मर्जी होती. दोस्ताच्या सैन्याचें आधिपत्य स्वीकारून त्यानें **ब्लेनहिम, रॅमिलीज्, औडेनार्ड** व **माल्प्लाके** येथील ल्ढाया जिंकून फ्रेंचाचा पूर्ण पराभव केला. १७०१ मध्यें इग्लडात मार्लबरोचा कैवारी व्हिगपक्ष अधिकारापासून पतन पावला व टोरीपक्ष अधिकारारूढ झाला. हार्लेच्या सल्लयावरून मार्लबरोला बडतर्फ करण्यात आलें व त्याच्या जागीं डयूक ऑफ ऑर्मंड याला नेमण्यात आलें. १७१४ मध्यें पहिल्या जार्जनें त्याला पुन्हा उच्चपदाला चढविलें. तो १७०२ मध्यें मरण पावला.

मार्लबरोमध्यें काम करण्याची धमक फार दाडगी होती. तो कधींही थकलेला दिसत नसे. त्याला अपयश हा शब्दच माहीत नव्हता. त्याची शात वृत्ति भर सकटात देखील अढळ असे. तो कुशल सेनापती व नाणावलेला मुत्सद्दी होता. त्याची अधिकारलालसा फारच

जबर होती, इतकी कीं, हा दुसरा क्रॉमवेल होतो कीं काय अशी पुष्कळ लोकास शंका येई.

१०६ What do you know of Louis XIV of France ?
**फ्रान्सच्या चवदाव्या लुईविषयीं तुमास काय माहिती आहे ?**
हा दुसऱ्या चार्ल्सचा मामेभाऊ होता. तो अत्यंत महत्वाकांक्षी असून युरोपमध्यें फ्रान्सला अग्रपूजेचा मान मिळवून देण्याची त्यानें हावँ धरली होती. लुईनें ७० वर्षें राज्य केलें व यावेळीं फ्रान्सचें वैभव शिखराला पोहोचलें होतें. व्यापारवृद्धी झाली होती. अमेरिकेंत फ्रेंचाच्या वसाहती स्थापन झाल्या होत्या. अत्यंत अनुभवशीर सेनापती त्याच्या हाताखालीं होते. त्याच्या वेळच्या राजांत लुईइतका राजकारणी व चोरणी मुत्सद्दी कोणीही नव्हता. अशा रीतीनें सर्व परिस्थिती अनुकूल असल्यामुळें त्यानें अखिल युरोपखंड आपल्या वर्चस्वाखालीं आणण्याचें धाडस करणें मुळींच वावगें नव्हतें. पण स्पॅनिश सक्सेशनच्या लढ्यात त्याची वागणूक चढेलपणाची व गैरमुत्सद्देगिरीची झाल्यामुळें युरोपखंड त्याच्या विरुद्ध एकवटलें. तिसऱ्या विल्यमसारखा जबरदस्त शत्रू त्याला भेटल्यामुळें त्याच्या सर्व महत्वाकांक्षा लयास गेल्या.

१०७ Explain why the Tudors were allowed absolute power, while the Stuarts were not ?
**ट्यूडर राजांनीं अनियंत्रित राज्यकारभार केला तसा स्टुअर्ट राजांना कां करतां आला नाहीं तें सांगाः—**

ट्यूडर राजे तख्ताधीन झाले त्यावेळीं इंग्लंडची फारच दैन्यावस्था झाली होती. ( प्रश्न ४ पहा. ) तेव्हा अशा आणीबाणीच्या प्रसंगीं लोकांना जोमदार राज्यकर्त्यांची जरूरी होती. ह्मणून त्यांनीं सर्व सत्ता अनियंत्रितपणें राजांच्या हातीं राहूं दिली. गुलाबाच्या युद्धांत बरेचसे प्रबल उमराव मारले गेले असल्यामुळें कॉमन्स सभा

अजून राजाला धाकात ठेवण्याइतकी समर्थ झाली नसल्याकारणानें राजसत्तेवर दडपण मुळींच नव्हतें. याशिवाय परचक्रापासून इंग्लंडला अनेकवार भीती असल्याकारणानें लोकाना अंत स्थ युद्ध करण्यास अवसर मिळाला नाहीं. आणखी एक विशेष गोष्ट ह्मणजे टयूडर राजाच्या हातीं जरी अनियत्रित सत्ता होती तरी त्या सत्तेचा उपयोग त्यानीं देशहिताकरितांच केला. त्याचें ध्येय व लोकाचें ध्येय एकच असल्यामुळें विरोधाचे प्रसग विशेष आले नाहींत.

पण स्टुअर्ट अमलाच्या आरंभींच ही स्थिती पालटली. स्पेनचा पराभव होऊन परचक्राची भीती नाहींशी झाली असून सर्वत्र स्थिरस्थावरता प्राप्त झाली होती. तेव्हां लोकाना अंत स्थ गोष्टींकडे लक्ष देण्यास अवसर मिळाला. लोकामध्यें आतां विश्वास उत्पन्न झाला होता. सुदैवानें ह्मणा किंवा दुर्दैवानें म्हणा स्टुअर्ट घराण्यातील राजे कमकुवत निघाले. टयूडराचें धोरण व त्याची कर्तृत्वशक्ती स्टुअर्ट राजाच्या अंगीं बिलकूल नव्हती. अशा रीतीनें स्टुअर्ट अमदानींत लोकानीं राजाना अनियत्रित सत्ता दिली नाहीं व दिली असती तरी तिचा उपयोग करण्याचें सामर्थ्य व धोरण स्टुअर्टांच्या आगीं नव्हतें.

**१०८** What were the causes of the struggle between the Stuart Kings and their Parliaments ?
**स्टुअर्ट राजे व पार्लमेंट यांमधील लढ्याचीं कारणें सांगा:—**

(१) टयूडर राजानीं अनियत्रित सत्ता गाजविली होती. तशीच स्टुअर्टांनींही गाजविण्यास सुरवात केली. पण यावेळीं अशाप्रकारचें शासन निमूटपणें सोसण्याला राष्ट्र तयार नव्हतें. ( १०७ पहा. ) त्यामुळें स्टुअर्टांना विरोध झाला. परंतु तात्कालिक कारणें खालीलप्रमाणें होतीं.

( २ ) धार्मिक —स्टुअर्ट राजानीं प्युरिटन लोकांचा छळ केला· पण या पंथात कर्तृत्ववान पुढारी होते व त्यानीं राजसत्तेला आळा घालण्याचे कामीं पुढाकार घेतला याशिवाय स्टुअर्ट राजाची कॅथोलिक लोकावर मेहेरनजर असे ही गोष्ट ब्रिटिश जनतेस मुळींच खपला नाहीं

( ३ ) स्टुअर्ट राजाची आपल्या अधिकाराविषयीं विचित्र मतें — पार्लमेंटच्या समतीशिवाय कर बसविण्याचा, व कायदे करण्याचा आपल्याला अधिकार असून आपले प्रधान पार्लमेंटला जबाबदार नाहींत, राजसत्ता आपल्याला ईश्वरदत्त असून, लोकाना राजाला जाब विचारण्याचा मुळींच अधिकार नाहीं असें ते प्रतिपादन करीत. व या समजुतीच्या जोरावर त्यानीं पुष्कळ बेकायदेशीर कृत्यें केलीं. त्यामुळें त्याच्याविरुद्ध काहूर माजलें

( ४ ) परराष्ट्रीय धोरणः—इंग्लडचे पिढीजात शत्रु, स्पेन व फ्रान्स, याच्यासारख्या राष्ट्राशीं स्नेह सपादन करण्याचें, व हॉलंड, जर्मनी याच्यासारख्या प्रॉटेस्टट राष्ट्राना मदत न करण्याचें धोरण त्यानीं स्वीकारिलें. हें धोरण इंग्लिश जनतेच्या धोरणाविरुद्ध होतें.

१०९ "It has been said that the Stuarts could never profit by experience" Can you endorse the view? "**स्टुअर्ट राजानीं अनुभवाचा फायदा बिलकूल घेतला नाहीं असें म्हणतात.**" यावर तुमचें काय म्हणणें आहे तें सांगा —स्टुअर्ट घराण्यातील पहिला राजा जेम्स याच्या कारकीर्दीतच लोकमताचा वारा कसा काय वहात होता हें पूर्णपणें दिसून आलें. बेकायदेशीर कृत्याना प्रजेनें विरोध केला. व लोकांची त्याजविषयीं वसत असलेली पूज्यबुद्धि नाहींशी झाली. परतु पहिल्या चार्ल्सनें बापाच्या अनुभवावरून धडा न घेता, जेम्सचें अरेरावीपणाचें

धोरण पुढें चालविलें. याचें पर्यवसान त्याचा शिरच्छेद होण्यांत झालें. या ठळक उदाहरणावरून तरी पुढील राजांनीं शहाणपण शिकावयास पाहिजे होतें. परंतु तसें न होता दुसऱ्या चार्ल्सनें लोकमताविरुद्ध कॅथोलिक पंथाची पुन्हां स्थापना करण्याचा उद्योग सुरू केला. लोकानीं त्याला जोराचा विरोध केला. या विरोधाची मजल **टेस्ट ॲक्ट व एक्सक्ल्यूजन** बिल ( दुसऱ्या जेम्सचा सिंहासनावरील हक्क नष्ट करणारा कायदा ) पास करण्यापर्यंत गेली. इतकें झालें तरी दुसऱ्या जेम्सनें पार्लमेंटच्या मध्यस्तीशिवाय राज्यकारभार करण्याचा, व कॅथोलिक पंथ इंग्लंडवर लादण्याचा प्रयत्न केलाच व त्याचें पर्यवसान १६८८ च्या राज्यक्रांतींत झालें. "मागच्यास ठेंच व पुढचा शहाणा" अशी म्हण आहे. पण स्टुअर्ट राजांनीं या अनुभवसिद्ध म्हणीकडे दुर्लक्ष केलें. ह्मणूनच त्यांचा नाश झाला.

११० "It has been said that the Stuart Period is characterized as the age of bad Government & good laws, and is distinguished for the conlict of the principle of Liberty & Despotism" Can you justify the statement? "**वाईट राजशासन आणि चांगले कायदे, आणि स्वातंत्र्य व अनियंत्रित राजसत्ता यांमधील लढ्याकरितां स्टुअर्ट अम्मल मसिद्ध आहे**" असें ह्मणतात या विधानाची सत्यता सिद्ध करा.

राजसत्ता ईश्वरदत्त असून राजानें अमुक करावें किंवा अमुक करूं नये असें सांगण्याचा प्रजेला मुळींच हक्क नाहीं असें स्टुअर्टांचें मत होतें. ह्मणून प्रजेचा सल्ला न घेतां आपल्याला वाटतील ते कायदे त्यांनीं केले व वाटतील तसे कर घेतले व अनेक बेकायदेशीर कृत्यें केलीं ( प्रश्न १११ पहा. ) त्यामुळें स्टुअर्ट अंमल हा जुलमा-

करितां प्रसिद्ध झाला.. पण स्टुअर्टांच्या बेकायदेशीर कृत्यांमुळें चिडून जाऊन आपल्या हक्कांच्या रक्षणाकरितां राजसत्तेला विरोध करण्यास लोक तयार झाले व अनेकवार राजांना लोकमताला मान वांकवाचयास लावून अनेक उत्तम कायदे करून घेतले. त्यांपैकीं हेबिअस् कॉर्पस् ॲक्ट, बिल् ऑफ् राइट्स्, ॲक्ट ऑफ् सेट्ल्मेंट हे कायदे विशेष महत्वाचे आहेत. अशा रीतीनें जरी स्टुअर्ट राजांचा कारभार जुलुम जबरदस्तीचा झाला तरी त्यामुळें लोकांचा फायदाच झाला. कारण लोक आपल्या हक्कांकरितां झटले व ते हक्क त्यांनीं अनेक उत्तम कायदे करून त्या द्वारा प्रस्थापित केले.

१११ Describe in short the illegal acts of the Stuart kings. **स्टुअर्ट राजांनीं केलेल्या बेकायदेशीर कृत्यांची थोडक्यांत माहिती द्याः**—स्टुअर्ट राजांच्या बेकायदेशीर कृत्यांना पहिल्या जेम्सपासून सुरवात झाली.

(१) पार्लमेंटच्या संमतीशिवाय जकात व कर बसविणें; उदाहरणार्थ शिपमनी. (२) जाहीरनामे काढून त्यांना लोकांनीं कायद्याप्रमाणें मानलें पाहिजे असा आग्रह धरणें. (३) अस्तित्वांत असलेले कायदे तात्पुरते रद्द करणें. (४) राजांचे मंत्री राजाला जबाबदार असून पार्लमेंटला त्यांच्या कृत्यांवर चर्चा करण्याचा अधिकार नाहीं असें प्रतिपादन करणें. (५) लोकांच्या इच्छेविरुद्ध त्यांजवर धर्ममतें लादणें. (६) जे लोक राजाचे हुकूम अमान्य करतील त्यांची चौकशी करण्याकरितां स्टार चेंबर, हायकमिशन कोर्ट, एक्लिझिॲस्टिकल कोर्ट यांच्या सारख्या बेकायदेशीर कोर्टांचा उपयोग करणें. (७) न्यायाधीश हे राजाचे नोकर असल्यानें त्यांनीं राजाच्याच मताप्रमाणें निकाल दिला पाहिजे असा आग्रह धरणें. (८) चौकशी शिवाय आपल्या शत्रूंस कैदेंत टाकणें वगैरे.

**११२ स्टुअर्ट राजांच्या कालांत राजसत्तेवर नियंत्रण घालणारे कोणते कायदे पास झाले तें सांगाः—**

( १ ) पिटिशन् ऑफ् राइट्स् ( २ ) ट्राएनिअल बिल, राज्यकर्ते पार्लमेंट न बोलाविता कित्येक वर्षे एकट्यानेंच राज्यकारभार चालवित असत तेव्हा दर तीन वर्षांनीं पार्लमेंट बोलाविलेंच पाहिजे असा कायदा पास करण्यात आला

( ३ ) हेबिअस् कॉर्पस ॲक्ट, ( ४ ) बिल् ऑफ् राइट्स्, स्टुअर्ट कारकीर्दीच्या अतापर्यंत लोकानीं जे जे हक्क संपादन केले होते ते सर्व हक्क यात नमूद केले असून ते राजानें पाळलेच पाहिजेत अशी तिसऱ्या वुइल्यमला त्याच्या राज्यारोहण्याच्या वेळीं अट घालण्यात आली होती.

११३ " The theory of Divine Right of kings cost one of the Stuarts his life and another his crown ' What was that theory ? Explain how it led to such results **"डिव्हाइन् राइट् ऑफ् किंग्ज्" किंवा "राजसत्ता ईश्वरदत्त आहे " या तत्त्वाच्या प्रतिपादनानें एका स्टुअर्ट राजास प्राणास मुकावें लागलें व दुसऱ्यास सिंहासनास मुकावें लागलें "** या विधानात निर्दिष्ट केलेलें तत्त्व कोणतें व त्यामुळें वर सांगितलेले परिणाम कसे घडून आले ते सांगा — डिव्हाइन राइट ऑफ किंग्ज् ५२ ( २ ) पहा.

या तत्वाला अनुसरून स्टुअर्ट राजानीं अनेक बेकायदेशीर कृत्यें केलीं त्यामुळें लोकक्षोभ होऊन पहिल्या चार्ल्सला प्राणास मुकावें लागलें. ( प्रश्न ५५ शेवटचा पॅरा पहा. ) व जेम्सला इंग्लंडची गादी सोडून फ्रान्सला पळून जावें लागलें. ( प्रश्न ८४ पहा ).

११४ It is said that during the reign of

the Stuart Kings England lost the position she had acquired as a great continental power in the reign of Elizabeth Justify the remark.
**" एलिझबेथच्या कारकीर्दीत युरोपखंडांत इंग्लंडला जो एक बलाढ्य राष्ट्र म्हणून दर्जा प्राप्त झाला होता, तो स्टुअर्ट राजांच्या अंमलांत नष्ट झाला असें म्हटलें जातें.** या विधानाची सत्यता सिद्ध करा —

एलिझबेथच्या कारकीर्दीत स्पेनचा पराभव झाल्यामुळें इंग्लडचे शत्रू फ्रान्स व स्पेन याच्याशीं पहिल्या जेम्सनें दोस्ती करण्याचे प्रयत्न केले. ही गोष्ट इंग्लडच्या इभ्रतीला कमीपणा आणणारी होती. त्याच प्रमाणें त्यानें प्रॉटेस्टंट राष्ट्रांना मदत न केल्यामुळें त्याचें जेम्स व इंग्लंड याजविषयीं वाईट मत झालें. पहिल्या चार्ल्सच्या कारकीर्दीत अंतस्थ कलहामुळें इंग्लडला परराष्ट्रीय राजकारणात लक्ष घालण्यास अवसरच मिळाला नाहीं. त्यापुढील राजे दुसरा चार्ल्स व दुसरा जेम्स हे फ्रान्सचे पेन्शनर बनले असल्यामुळें त्याच्याच तंत्रानें वागत होते. यामुळें युरोपीय राजकारणात इंग्लडला कांहींच महत्व न राहून त्याचा एलिझबेथनकालीन लौकिक नष्ट झाला.

११५ It is said that Religion played a very important part in the history of England during the Stuart period. Justify the statement
**इंग्लंडच्या इतिहासांत स्टुअर्ट अमदानींत धर्मामुळें बऱ्याच उलाढाली झाल्या हें म्हणणें खरें आहे काय ?**

पार्लमेंट व स्टुअर्ट राजे याच्यामधील लढ्याच्या कारणांपैकीं धर्म हे एक मुख्य कारण होतें. पहिला जेम्स व दुसरा चार्ल्स हे एपिस्कोपेलियन पंथाचे पुरस्कर्ते असून त्यानीं प्युरिटन लोकांचा फार छळ केला. त्यामुळें त्याच्या विरोधकामध्यें प्युरिटन लोकांचा भरणा विशेष झाला

व राजकीय कलहाला धर्माचें अधिष्ठान मिळालें. प्युरिटनांनी राजाला कसून विरोध केला व या विरोधाचेंच पर्यवसान सिव्हिल वॉर व त्यानंतर चार्ल्सला देहांतशासन होण्यात झालें. सिव्हिल वॉर नंतरच्या प्रजासत्ताक अमदानीत सर्व कारभार प्युरिटन लोकांचे हातीं असून त्यांनी प्युरिटन पंथ इंग्लंडवर लादण्याचा प्रयत्न केला व इतर पंथांचा छळ केला. तेव्हां दुसऱ्या चार्ल्सच्या कारकीर्दीत प्रतिक्रिया म्हणून एपिस्कोपल पंथीयांनीं कॅथोलिक व प्युरिटन यांचा छळ केला. दुसरा चार्ल्स व दुसरा जेम्स यांचें मुख्य धोरण कॅथोलिक पंथाची पुन्हां स्थापना करणें हें होतें म्हणजे धार्मिकच होतें. त्याच्या राजकारणात धर्मकारणच प्रमुख होतें. याच कारणामुळें टेस्ट ॲक्ट, एक्सक्ल्यूजन बिल वगैरे कायदे पास झाले व धार्मिक मतवैचित्र्यामुळेंच दुसऱ्या जेम्सला गादी सोडून पळून जावें लागलें. स्टुअर्ट राजाच्या धार्मिक छळालाच कंटाळून पुष्कळ कॅथोलिक व प्युरिटन लोक इंग्लंड सोडून गेले व त्यांनीं अमेरिकेंत वसाहती स्थापन केल्या. धार्मिक छळामुळेंच आयर्लंड इंग्लंडचा कायमचा शत्रू होऊन बसलें.

११६ What were the positions of the king & the Parliament in relation to each other, at the end of the Stuart Period? स्टुअर्ट अंमलाच्या अखेरीस पार्लमेंट व राज्यकर्ते यांचे परस्पर संबंध काय होते ते सांगा:—

स्टुअर्ट अमलाच्या अखेरीस पार्लमेंट व राजे यामधील भांडण संपलें असून या लढ्यात पार्लमेंट यशस्वी झालें होतें. जुनें घराणें गादीवरून काढून टाकण्यात आलें व राजसत्ता वंशपरंपरागत नसून पार्लमेंटच्या मर्जीवर अवलंबून आहे असें जाहीर करण्यात आलें. नवीन राजाला पार्लमेंटचे हक्क मान्य करावे लागले व त्यानंतरच

त्याला गादीवर बसविण्यांत आलें. या शिवाय दुसरे अनेक कायदे करण्यांत येऊन राजाची सत्ता बरीच नियंत्रित करण्यांत आली.

पैसा व सैन्य या दोन गोष्टी कोणत्याही सत्तेचे आधारस्तंभ होत. म्हणून या दोन गोष्टींवर रिव्होल्यूशन नंतर पार्लमेंटनें तावा मिळविला. राजाचा तनखा सबंध हयातीचा न ठरवितां फक्त एक वर्षापुरताच मंजूर करावा असें ठरविण्यांत आलें. प्रत्येक वर्षी नवीन वर्षाचें अंदाजपत्रक ( Budget ) पार्लमेंटला सादर केलेंच पाहिजे असें ठरविण्यांत आलें. त्याचप्रमाणें म्युटिनी अॅक्टाअन्वयें सैन्याची मुदत फक्त एक वर्षाची ठरविण्यांत आली व ती दर वर्षी वाढविणें पार्लमेंटच्या हातीं ठेवण्यांत आलें. राज्यकारभाराच्या मुख्य नाड्या सैन्य व पैसा पार्लमेंटच्या हातीं आल्यामुळें, त्या वाटेल त्या वेळीं आंवळून राजाला ताब्यांत ठेवणें पार्लमेंटला शक्य झालें. अशा रीतीनें राजाचें अस्तित्वच पार्लमेंटच्या अधिकारांतलि गोष्ट झाली व तेव्हांपासून पार्लमेंटची अनुत्तम श्रेष्ठता प्रस्थापित झाली. याच वेळीं न्यायाधिशांना राजानियंत्रणापासून स्वतंत्र करण्यांत आलें. त्यामुळेंही राजाचें वर्चस्व बरेंच कमी झालें.

११७ What are the main features of the Stuart Period that distinguish it from others ?

**स्टुअर्ट अंमलाचे विशेष सांगा:—**

( १ ) ट्यूडर अंमलांतील इंग्लंडचा स्थिति बिकट असल्यामुळें, प्रजास्वातंत्र्याचे प्रयत्न लांबणीवर पडले होते, पण स्टुअर्ट अमलाच्या सुरवातीलाच सर्वत्र स्थिरस्थावर झालें असल्यामुळें लोकांना अंतःस्थ भानगडींकडे लक्ष देण्यास फुरसत मिळाली व त्यांनीं स्टुअर्ट राजाच्या अनियंत्रित सत्तेला आळा घालण्यास सुरवात केली. त्यामुळें राजा व प्रजा याच्यामध्यें विरोध आला. व हा विरोध सर्व स्टुअर्ट कारकीर्दी-

भर टिकला. आणि या अंमलाच्या शेवटीं पार्लमेंटचें श्रेष्ठत्व निरावाध-पणें प्रस्थापित झालें व हा लढा मिटला. पुढील कारकीर्दींत मुख्य प्रश्न राजा व पार्लमेंट याच्या परस्पर अधिकारासंबधी नसून पुढील काल हा निरनिराळ्या राजकीय पक्षोपक्षाचा काल होय.

(२) इंग्लडच्या परदेशस्थ वसाहतींना सुरवात होते.

(३) धर्मामुळें या कारकीर्दींत जितक्या उलाढाली झाल्या तितक्या कोणत्याही अमलात झाल्या नाहींत.

११८ Who were the Puritans? What part did they play in the religious and political history of England in the days of Cromwell and Charles II

**प्युरिटन लोकांविषयीं तुम्हांस काय माहिती आहे? क्रॉमवेल व दुसरा चार्लस यांच्या कारकीर्दींत त्यांनीं धर्मकारणांत व राजकारणांत काय भाग घेतला तें सांगा—**

प्युरिटन हे जहाल प्रॉटेस्टट होते. बायबलच्या आज्ञेप्रमाणें ततोतंत आचरण करणें हें त्यांचें ध्येय होतें. व पहिला चार्लस आणि दुसरा जेम्स याच्या धार्मिक छळाला कटाळून त्यांनीं राज-सत्तेला विरोध करण्याचें कंकण बांधलें व त्याच्या धार्मिक विरोधाची गाडी राजकीय विरोधाच्या रुळावर गेली. या विरोधाचें पर्यवसान "सिव्हिल वॉर" व चार्लसला फाशीं यात झालें. त्यानंतर दहा वर्षेपर्यंत त्यांचेंच राज्य होतें. त्या अवधींत इंग्लडात प्युरिटन पंथ स्थापण्याचा त्यांनीं प्रयत्न केला व कॅथोलिक आणि एपिस्कोपल पंथीयाचा छळ केला. त्याचा परिणाम असा झाला कीं, दुसऱ्या चार्लसच्या कारकीर्दींत पार्लमेंटनें त्याच्याविरुद्ध फारच कडक व जाचक कायदे केले व त्याचा छळ केला. त्यामुळें त्यांचें वर्चस्व संपुष्टात आलें.

११९ Describe the domestic and foreign policy of William III. Why is he considered a great statesman? ( B. U 1920 )

**( अ ) तिसऱ्या विल्यमचें अंतःस्थ व परराष्ट्रीय धोरण सांगून ( ब ) तो मोठा राजकारणी पुरुष होता असें कां मानण्यांत तें लिहाः—**

( अ ) ९६ प्रश्न पहा.

( ब ) तिसरा वुइल्यम हा इंग्लंडांत परका असून लोकांना त्याजबद्दल विशेष प्रेम वाटत नव्हतें. पार्लमेंटचें त्याजबरोबरचें वर्तन नेहमीं साशंक असे. इतरही पुष्कळ अडचणी होत्या. असें असूनही त्यानें इंग्लंडांत स्वस्थता राखली. धार्मिक बाबतींत सवलतीच्या धोरणाचा पाया घातला. पार्टी सिस्टिमला सुरवात याच्याच कारकीर्दींत झाली.

परराष्ट्रीय राजकारणांत त्यानें आपलें चातुर्य विशेष दाखविलें. चवदाव्या लुईसारख्या धोरणी व महत्त्वाकांक्षी राजाशीं त्याला टक्कर द्यावयाची होती. एवढ्याच करितां त्यानें ग्रँड अलायन्स जमवून आणिलें. युरोपांत " बलसमत्व " राखण्याचें इंग्लंडचें सदैव धोरण असतें व **या धोरणाचा वुइल्यम हा आद्य पुरस्कर्ता होय.**

१२० What were the effects of the Revolution of 1688 on (a) Standing army (b) Appointment of ministers (c) Positon of judges ( B. U. 1921 )

**( अ ) खडी फौज ( ब ) मंत्र्यांची नेमणूक व (क) न्यायाधिशांची स्थिति यांजवर १६८८ च्या राज्यक्रांतीमुळें काय परिणाम घडून आलाः—**

दुसऱ्या जेम्सच्या अधिकारत्यागानंतर ज्यावेळीं पार्लमेंटनें

तिसऱ्या वुइल्यमला गादी दिली त्यावेळीं " डिक्लेरेशन ऑफ राइट्स् " या मसुद्यावर त्याची सही घेतली. पार्लमेंटच्या संमतीशिवाय खडी फौज ठेवणें हें बेकायदेशीर आहे असें या मसुद्यांत एक कलम होतें. पुढील वर्षी म्युटिनी अॅक्ट पास करण्यांत आला. या कायद्याअन्वयें पार्लमेंटनें खड्या फौजेच्या खर्चाकरितां एकच वर्षापुरती मंजुरी द्यावी व तें सैन्य पुन्हां पुढील वर्षी पाहिजे असल्यास पुन्हां मंजुरी घ्यावी असें ठरलें. राजा फौजेचा दुरुपयोग करीत आहे असें वाटल्यास पैसे देण्याचें नाकारण्याचा व अशा रीतीनें फौज कमी करण्याचा अधिकार पार्लमेंटकडे आला. अशा रीतीनें १६८८ च्या राज्यक्रांतीनें पार्लमेंटला खड्या फौजेवर ताबा दिला.

(ब) १६८८ च्या राज्यक्रांतीपर्यंत राज्यकर्तेच आपल्या मर्जीतील लोकांस मंत्रीपदावर नेमीत असत व मंत्र्यांची नेमणूक राजाकडून होत असल्यामुळें ते पार्लमेंटला जबाबदार नाहींत व पार्लमेंटला राजमंत्र्यांना जाब विचारण्याचा किंवा शिक्षा करण्याचा अधिकार नाहीं असें स्टुअर्ट राजांचें मत होतें. स्टॅफर्ड, डॅन्बी, क्लॅरेंडन वगैरे मंत्र्यांना पार्लमेंटनें शेवटीं आपल्या अधिकाराची चुणूक दाखविलीच. परंतु हा अधिकार पार्लमेंटला नहमींच नियमितपणें गाजवितां येत नव्हता. परंतु १६८८ च्या राज्यक्रांतीनंतर ही स्थिति पालटली. मंत्रिमंडळ पार्लमेंटला जबाबदार असतें हें तत्व मान्य केलें गेलें. राज्यकर्ते बहुमतवाल्या पक्षांतूनच ( Party in power or dominant party) मंत्र्यांची निवड करूं लागले. व पार्टीसिस्टिम् (Government by Party system ) या नांवानें प्रसिद्ध असलेली व्यवस्था अस्तित्वांत आली.

(क) राज्यक्रांतीनंतर न्यायाधिशांना राजसत्तेच्या दडपणापासून स्वतंत्र करण्यांत आलें. टयूडर व स्टुअर्ट राजे आपलें वजन पाडून

न्यायाधीशाकडून आपल्याला अनुकूळ निकाल करून घेत असत. पण यानतर न्यायाधिशाना बडतर्फ करण्याचा अधिकार राजाचे हातून काढून घेण्यात आला. अशा रीतीनें राजनियंत्रण कमी झाल्यामुळें न्यायाची अमलबजावणी पक्षपातविरहित व चोख रीतीनें होऊं लागली.

**१२१ स्टुअर्ट राजांच्या अमदानींतील स्कॉटलंडचा इतिहास थोडक्यांत लिहा —**

एलिझबेथनंतर स्कॉटलंडचा राजा सहावा जेम्स हाच इंग्लडच्या गादीवर पहिला जेम्स म्हणून आल्यामुळें हे दोन देश एकाच छत्राखालीं आले. ( प्रश्न ५० पहा ) पण इतर सर्व बाबतींत हे दोनही देश आपआपला कारभार स्वतंत्रपणें चालवीत होते. या दोनही देशाचे कायदेकानू निरनिराळे असून त्याचीं पार्लमेंटें निरनिराळीं होतीं. दोघाचे राष्ट्रीय धर्मपथही निरनिराळे होते पहिल्या चार्ल्सचा धर्मकारणांतील मंत्री आर्चबिशप लॉड यानें इंग्लंडमधील प्रार्थनेचा विधि ( एपिस्कोपेलियन पथ ) स्कॉटलडवर लादण्याचा प्रयत्न केला. पण स्कॉटलडमधील बहुजनसमाज प्रेसबिटेरिअन असून त्यानीं लॉडला जोराचा विरोध केला. पण राजानें त्याचें म्हणणें न ऐकल्यामुळें युद्धाचा प्रसग आला. स्कॉटिश लोकानीं पराभव करून त्याला तह करण्यास भाग पाडलें. (प्रश्न ५० मधान "स्कॉच कॉव्हेनंटर्स" वरील नोट पहा. ) सिव्हिल वॉर सुरू झाल्यावर ब्रिटिश पार्लमेंटने स्कॉटिश सैन्याची मदत मागितली ( ६७ सॉलेमलीग आणि कॉव्हेनंट वरील टिप्पणी पहा. ) व या सयुक्त सैन्यानें राजाचा मार्स्टन मूर येथे पराभव केला यानतर चार्ल्सनं स्कॉटिश लोकाचीं मदत मिळविण्याचा यत्न केला पण त्यान त्याला यश न येऊन स्कॉटिश लोकानीं त्याला पकडून इंग्लिश पार्लमेंटाच्या हवालीं केलें यानंतर इंग्लिश लोकानीं चार्ल्सला फाशीं दिलें व लोकसत्ताक राज्य स्थापिलें. पण या

दोनही गोष्टी स्कॉटिश लोकांना न आवडून त्यांनीं चार्लसचा मुलगा (दुसरा) चार्लस हा आपला राजा असल्याची द्वाही फिरविली. तेव्हां इंग्लिश फौजेनें स्कॉटलंडवर स्वारी करून स्कॉटिश सैन्याचा डनबार आणि वुर्सेस्टर येथें पराभव केला. तेव्हां चार्लसला पळून जाणे भाग पडलें व अशा रीतीनें स्कॉटलंडांत स्थिरस्थावर झालें. यानंतर स्कॉटलंड व इंग्लंड यामध्यें युद्धाचा प्रसंग आला नाहीं पण या दोन देशांतील पुरातन चुरस अजून संपली नव्हती व्यापारविषयक बाबतींत अनेक वखेंट होऊं लागलें. स्कॉटलंडांत दारिद्र्य ज्यास्त होतें व घरा संपत्ती आणण्याकरितां तिसऱ्या वुइल्यिमच्या कारकीर्दीत डारायन् स्कीम नांवाची एक योजना तयार करण्यांत आली पण त्यांत स्कॉटिश लोकांना अपयश येऊन त्यांनीं या अपयशाचें खापर इंग्लिश लोकांवर फोडल्यामुळें या दोन देशांतील परस्पर सनव त्रिकोपास जाऊन वमनस्य येणार असें स्पष्ट दिसूं लागलें तेव्हां या कलहाचा समाधानकारक निकाल लावण्याच्या हेतूनें १७०७ मध्यें या दोनही देशांच्या पार्लमेंटाचें एकीकरण करण्यांत आलें. तेव्हांपासून स्कॉटलंडचा भरभराट होत जाऊन स्कॉटलंड व इंग्लंड या दोन राष्ट्रांचें एक संघटित राष्ट्र बनलें (प्रश्न १०१ पहा.)

होऊन इंग्लंडचें समुद्रावरील वर्चस्व वाढल्यामुळें नवीन सापडत असलेल्या भूखंडामध्यें आपल्या वसाहती कराव्या अशी धाडशी इंग्लिश लोकांना सहाजिकच इच्छा झाली. टयूडर अंमलांत वॉल्टर रालेनें एक वसाहत स्थापण्याचा यत्न केला. पण त्यात त्याला यश आलें नाहीं वसाहती वसविण्याला खरी सुरवात स्टुअर्ट अमलातच झाली. पहिल्या जेम्स पासून एक चार्टर घऊन काहीं लोकानीं १६०६ मधें जॉन-स्मिथ या उत्साहीं पुढाऱ्याच्या देखरेखीखालीं व्हर्जिनिया नावाची एक वसाहत स्थापन केली. पहिल्या जेम्सच्या धार्मिक छळाला प्युरिटन लोक कटाळले व ते स्वदेश सोडून बाहेर जाऊ लागले. त्यापैकीं एक टोळी मेफ्लॉवर या जहाजात बसून अमेरिकेस गेली व तेथें त्या टोळींतील लोकानीं वसाहत स्थापन केली. ही टोळी "पिल्ग्रिम फादर्स" या नावानें प्रख्यात आहे थोडक्याच काळात मॅसॅच्युसेट्स्, -हृोड आयलंड, कनेक्टिकट व न्यू हॅंपशायर या चार वसाहती स्थापन होऊन त्या सर्वांना मिळून न्यू इंग्लंड हें नाव मिळालें. पहिल्या चार्लसच्या कारकीर्दींत मेरीलॅंड या नावाची एक कॅथॉलिक वसाहत स्थापन झाली. वेस्ट इंडिज बेटांवर वर्चस्व स्थापण्याला इंग्लंडनें १६१२ मध्यें सुरवात केली व पुढील अर्ध्या शतकात बर्म्युडास, बार्बेडोस, नेव्हिस, ॲंटिग्वा, मॉटसेरट, जमेका वगैरे बेटे ताब्यात घेतलीं. दुसऱ्या चार्लसच्या कारकीर्दींत नॉर्थ कॅरोलिना, साउथ कॅरोलिना, डेलिव्हर व पेन्सिल्व्हेनिया या वसाहती नवीन वसविण्यात आल्या व न्यू हॉलंड नावाची डच वसाहत जिंकण्यात येऊन न्यूयॉर्क असे तिचें नाव ठेवण्यात आलें. थोडक्याच काळात न्यूयॉर्क जवळ जर्सी नावाची आणखी एक वसाहत स्थापन झाली.

---

# भाग तिसरा.

## हॅनोव्हर घराणें.

१२४ हॅनोव्हर घराण्याची वंशावळ याः—

पहिला जॉर्ज.
(१७१४–१७२७)

- २ रा जॉर्ज. (१७२७ ७६ )
  - फ्रेडरिक (मृ. १७५१)
    - ३ रा जॉर्ज (१७६०–१८२०)
      - ४ था जॉर्ज १८२०–१८३०
        - प्रिन्सेस चार्लोटा मृ. १८१७
      - फ्रेडरिक (डयूक ऑफ यॉर्क मृ. १८२७).
      - ४ था विल्यम १८३०–३७
      - एडवर्ड (डयूक ऑफ् केंट. मृ. १८२०)
        - व्हिक्टोरिया=अल्बर्ट ऑफ् (१८३७–१९०१) सॅक्सकोबर्ग.
          - ७ वा एडवर्ड (१९०१–१९१०).
            - ५ वा जॉर्ज (१९१०–
- सोफिया (प्रशियाच्या फ्रेडरिक विल्यमशीं लग्न)
  - फ्रेडरिक दि ग्रेट

१२५ पहिल्या जॉर्जच्या कारकीर्दीतील ठळक गोष्टी सांगा.—१७१४–१७२७)

(१) व्हिग पक्षाचें वर्चस्व.
(२) १७१५ मधील जॅकोबाइट बंड.
(३) सेप्टेनिअल ॲक्ट.
(४) साऊथ सी बबल.

१२६ पहिल्या जॉर्जच्या कारकीर्दीत व्हिग पक्षाचें वर्चस्व होण्यास काय कारणें झाली व हें वर्चस्व किती काल टिकलें तें सांगा —हॅनोव्हर घराण्याच्या सुरवातीपासूनच व्हिग पक्ष अधिकारारूढ झाला. व या पक्षाचे वर्चस्व अर्धे शतक टिकले. (१७१४–१७६१) याला खालील गोष्टी कारणीभूत झाल्या —(१) इंग्लिश जनता प्रॉटेस्टंट असून त्याना प्रॉटेस्टंट पंथीय घराणें हवे होतें व हे प्रॉटेस्टंट पंथीय हनोव्हर घराणे इंग्लंडमध्यें प्रस्थापित होण्यास मुख्यतः व्हिग पक्षच कारणाभूत झाला होता. या पक्षानें या घराण्याला गादीवर आणल्यामुळें त्या घराण्यातील राजाचा ओटा व्हिग पक्षाकडे असणें सहाजिक होतें व त्यानीं व्हिग पक्षातूनच आपलें मंत्रिमंडळें निवडलीं. (२) हें घराणें परकी असून त्याना इंग्लंड मधील भाषा, राज्यपद्धती व चालीरीती मुळीच माहीत नसल्यामुळें त्यानीं आपला सर्व राज्यकारभार आपल्या मंत्रिमंडळाकडेच सोंपविला (३) या पक्षानें व्यापारी वर्गाचे लक्ष आपणाकडे ओढून घेतलें. (४) हॉउस ऑफ लॉर्ड्समध्यें या पक्षाचेच मताधिक्य असून कॉमन्स सभेवर लाचलुचपत व सत्ता याच्या जोरावर त्यानें आपलं वजन बसविलें होतें.

१२७ इ. सन १७१५ मधील जॅकोबाइट बंडाची हकीकत सांगून त्याचे परिणाम काय झाले ते सांगा:—हॅनोव्हरच्या जॉर्जला गादी मिळालेली पाहून दुसऱ्या जेम्सचा मुलगा जेम्स (मोठा

तातया) याला बरें वाटलें नाहीं तेव्हां इंग्लंडमधील स्टुअर्ट घराण्याचा अभिमान बाळगणारे लोक व फ्रान्सचा चवदावा लुई याच्या मदतीनें त्यानें इंग्लंडची गादी परत मिळविण्याचा यत्न केला. त्याच्या प्रोत्साहनानें स्कॉटलंडमध्यें अर्ल ऑफ मार व इंग्लंडांत लॉर्ड डर्वेंट वॉटर व फॉर्स्टर या गृहस्थांनीं बंड उभारलें पण फॉर्स्टरचा प्रेस्टन येथें आणि मारचा शेरीफ येथें पराभव होऊन बंडवाल्यांच्या फौजा उधळून गेल्या व मोठा तोतया फ्रान्सला पळून गेला.

मोठ्या तोतयाच्या अंगीं नेत्याला साजणारे गुण मुळींच नव्हते स्वतःचे यशाबद्दल त्यास कळकळही नव्हती बंडाची व्यवस्थाही पहिल्यापासून नीट ठेवण्यात आली नव्हता त्यामुळें बंडच फसलें

**परिणाम.**—(१) हायलन्डर्स (डोंगरांत राहणारे लोक) चीं शस्त्रें काढून घेण्यात आलीं (२) कॅथोलिकांविरुद्ध कडक कायदे करण्यात आले (३) नवीन निवडणूक केली तर, पार्लमेंटमध्यें कदाचित् जॅकोबाईट पक्षाचें बहुमत होईल म्हणून निवडणूक अजिबातच बंद करण्याच्या हेतूनें सप्टेनिअल ॲक्ट पास करण्यात येऊन चालू असलेल्या पार्लमेंटची मुदत वाढविण्यात आली

**१२८ सेप्टेनिअल ॲक्ट म्हणजे काय? तो पास होण्यास कोणती गोष्ट कारणीभूत झाली, त्याच्या योगानें व्हिग पक्षाला बळकटी कशी आली व त्यापासून मुख्य फायदे काय झाले तें सांगा:**—१७१६ सालीं पार्लमेंटचा नवी निवडणूक व्हावयाची होती पण नुकतेंच जेम्सपक्षीय लोकांचे बंड झालें असल्यामुळें, अशा परिस्थितींत पार्लमेंटची निवडणूक झाल्यास टोरी व जॅकोबाइट पक्षाचेंच बहुमत होईल तव्हां नवीन निवडणूक न करता पार्लमेंटचें अस्तित्वच आणखीं कांहीं काळ वाढविण्याच्या इरादानें "सप्टेनिअल ॲक्ट" (सप्तवार्षिक कायदा) पास करण्यात आला या कायद्याअन्वयें पार्लमेंटची **मुदत सात वर्षे असावी** असं ठरलें.

पार्लमेंटची मुदत आणखी सात वर्षे वाढल्यामुळे सभासदांना स्वैरथता मिळाली; व आपल्या पक्षाला बळकटी आणण्याला व्हिगपक्षाला वेळ मिळाला. हा जो जास्त वेळ मिळाला त्याचा उपयोग व्हिगपक्षानें लोकोपयोगी कामें करण्यात केल्यामुळे राष्ट्रामध्यें त्याच्याविषयीं चांगलें मत व विश्वासबुद्धि उत्पन्न झाली. मुख्य फायदे म्हटले म्हणजे राज्यकारभाराच्या धोरणात वारवार फरक होण्याचे बंद झाले व हॉउस ऑफ कॉमन्सला जास्त स्वातंत्र्य प्राप्त झाले.

**१२९ ( १ ) बॅंक ऑफ इंग्लंड ( २ ) नॅशनल डेट ऑफ् इंग्लंड व (३) साऊथ सी बबल यांची थोडक्यांत माहिती द्या –**

( १ ) या पेटीची स्थापना तिसऱ्या विल्यमच्या कारकीर्दीत १६९४ साली झाली. त्यामुळे आपला पैसा बुडण्याची भीति नाहीं अशा पेटीत ठेव ठेवण्याची सोय झाली.

( २ ) "बॅंक ऑफ इंग्लंडनें" जशी लोकांची सोय झाली तशी सरकारचीही झाली. या बॅंकेने सरकारला कर्जाऊ रकम दिली. व अशा रीतीने "नॅशनल डेट" उर्फ "राष्ट्रीय कर्जा"चा उगम झाला. लढाईच्या वेळी पैशाची जरूर असत व अशा वेळी सरकार राष्ट्राच्या नावानें कर्ज काढितें व त्याची फेड सवडीनुसार करते. इंग्लंडचे राष्ट्रीय कर्ज सध्या ८० कोटी पौंड असून दोन कोटी पौंड व्याजादाखल खर्च होतात.

( ३ ) **साउथ सी बबलः**—दक्षिण अमेरिकेशी व्यापार करण्याकरिता १७११ मध्ये एक 'साउथ सी' कंपनी स्थापन झाली. आरंभीं फारच भरभराट झाली. पुढें ७० लक्ष पौंड सरकारला देऊन, बॅंक ऑफ इंग्लंडकडे जी राष्ट्रीय कर्जाची व्यवस्था होती तीही या कंपनीनें आपल्याकडे घेतली. अशा रीतीने सरकारचें पाठबळ मिळाल्यामुळे कंपनीची पत वाढली व शंभर पौंड शेअरची किंमत

हजारपर्यंत चढली. या कंपनीची भरभराट पाहून आणखीही पुष्कळ मंडळ्या अस्तित्वात आल्या. यांपैकीं पुष्कळ दिखाऊ व फुसक्याच होत्या. पण लवकर श्रीमंत होण्याच्या अनावर इच्छेनें लोकांनी भराभर शेअर्स विकत घेतले. पण फायद्यासंबंधींच्या कल्पनांचा पोकळपणा लवकरच दृष्टोत्पत्तीस आला. त्यामुळे शेअर्सचा भाव भराभर उतरू लागला जो तो आपला शेअर विकण्यास उत्सुक झाला. पण आता विकत घेण्यास कोणीच तयार होईना. लवकरच साउथ सी कंपनी व इतर कंपन्या यांचे दिवाळे वाजले. " दक्षिण समुद्रांत व्यापार करणाऱ्या मंडळ्यांचा हा जो भ्रमाचा भोपळा फुटला" तो प्रसंग इतिहासांत ' साउथ सी बबल " ( Bubble = पाण्यावरील बुडबुडा. ) या नांवानें प्रख्यात आहे यावेळी रॉबर्ट वॉलपोल हा नांवाजलेला फडणवीस राष्ट्राच्या मदतीस धावून आला याने कंपन्यांच्या डायरेक्टरांच्या खाजगी इस्टेटी जप्त केल्या व कंपनीच्या भागीदारांना त्यांच्या शेअर पैकी बराच भाग परत दिला व अशा रीतीने या अरिष्टाचे दुष्परिणाम टाळले.

**१३० पहिल्या जॉर्जचा स्वभाव व त्याचें धोरण यांविषयीं माहिती सांगाः** पहिला जॉर्ज आळशी व मदबुद्धीचा होता इंग्लंडच्या गादीवर येण्यापूर्वी त्याचें सर्व आयुष्य जर्मनींत गेलें असल्यामुळे त्याला इंग्लिश भाषा मुळींच येत नव्हती व इंग्लिश राज्यघटना व राजकारण यांत तो अगदींच पारखा होता. त्यामुळे इंग्लंडच्या कारभारांत तो स्वतः मन घालीत नसे, तर सर्व सूत्रे त्यानें आपल्या व्हिग मंत्रिमंडळाच्या हातीं सोपविली होतीं.

**१३१ दुसऱ्या जॉर्जच्या ( १७२७-१७६० ) कारकीर्दीतील ठळक गोष्टी सांगाः—**

(१) एक्साइज बिल पुढें येतें. (१७३३)

पसरल्याबरोबर सर्व राष्ट्रास त्वेष चढला व स्पेनबरोबर युद्ध पुकारण्या विषयीं एकच ओरड झाली, तेव्हां सोवया नाखुषीनें वॉलपोलनें १७३९ मध्यें स्पेनविरुद्ध युद्ध पुकारलें. पण या युद्धांत इंग्लंडला यश आलें नाहीं. या अपयशाचें खापर वॉलपोलच्या माथीं मारण्यांत आलें. हें युद्ध चालविण्याच्या कामीं वॉलपोलनें हलगर्जीपणा केला असा त्याच्यावर आरोप करण्यात आला. तेव्हां त्यानें १७४२ मध्यें आपल्या जागेचा राजीनामा दिला.

१३४ जेंकिन्स इअर वॅरच्या अपयशाबद्दल वॉलपोलला कितपत जबाबदार धरतां येईल तें सांगा:—

वॉलपोल हा शांततेचा भोक्ता होता. युद्धाचा त्याला मनापासून कंटाळा असे. जेंकिन्स इअर वॅार ( जेंकिन्सच्या कानासंबंधीं युद्ध. ) हें युद्ध घडवून आणण्यात त्याचें अंग नव्हतें. उलट आरंभापासून तो युद्धाच्या विरुद्ध होता; तेव्हा अर्थातच त्याच्याकडून या युद्धाची नीट व्यवस्था ठेविली गेली नाहीं यात आश्चर्य नाहीं.

१३० (१) रॉबर्ट वॉलपोलचें चारित्र व (२) त्याचें धोरण याची थोडक्यांत माहिती देऊन (३) त्यानें कोणती राष्ट्रोपयोगी कामगिरी बजावली तें सांगा.—

सर रॉबर्ट वॉलपोल याचा जन्म १६७६ साली झाला. त्याचा स्वभाव सभ्य व विनोदी असून तो उदार अंतःकरणाचा होता. त्याला अनेक शत्रू होते. तरी त्यानें त्याचा घातपात करण्याचा कधींही प्रयत्न केला नाहीं. १७०८ पासून त्यानें अनेक महत्वाच्या जागांवर कामें केलीं. १७२१ पासून १७४२ पर्यंत तो मुख्य प्रधानाच्या जागेवर होता. २०-२१ वर्षे राज्य कारभाराचीं सर्व सूत्रें ज्याच्या हातीं होतीं असा इंग्लंडचा पहिला मुख्य प्रधान वॉलपोलच होय. तो १७४५ मध्यें मरण पावला.

व कानडा आपल्या ताब्यात आणला. ( १७५९ ) हिंदुस्थानातही **वॉंदिवॉश** व **पॉंडिचेरी** येथें फ्रेंचाचा पराभव होऊन हिंदुस्थानातील फ्रेंच वर्चस्व नष्ट झालें. ( १७६०–६१ ) अखेरीस १७६३ मध्यें **पॅरिस** येथें तह होऊन हें युद्ध थांबलें.

**पॅरिसच्या तहाचीं कलमें:—**(१) कॅनडा व फ्लॉरिडा हे प्रदेश ब्रिटिशाचे ताब्यात आले. (२) मिनॉर्का हें ठिकाण इंग्लंडला परत मिळालें. (३) पॉंडिचेरी हें व्यापाराचें ठिकाण फ्रेंचाना परत मिळालें. ( ४ ) हॅवाना व मॅनिला हीं बेटें स्पेनला देण्यात आलीं.

परिणाम —या युद्धाचे इंग्लंडला हितावह असे बरेच परिणाम घडून आले. युरोपमध्यें फ्रेंचसत्ता कमजोर झाली. फ्रेंचाच्या अमेरिकन वसाहती इंग्लिशाच्या ताब्यात गेल्या व अमेरिकेंतील फ्रेंच वर्चस्व नष्ट झालें. हिंदुस्थानात त्याचें सत्ताधीशत्व नष्ट होऊन तेथें त्याचा केवळ व्यापारापुरता संबंध राहिला. इंग्लंडचा सर्वत्र विजय होऊन त्याचें वर्चस्व अप्रतिहतपणें प्रस्थापित केलें गेलें. इंग्लंडच्या आरमारी सत्तेचा उत्कर्ष झाला, वसाहती वसविण्याचें काम जोरानें सुरू झालें व व्यापाराला सर्व जग मोकळें मिळालें. आणि इंग्लंडशीं चुरस करण्याचें सामर्थ्य कोणाचे अंगीं राहिलें नाहीं.

वसाहती व व्यापार या बाबतींत श्रेष्ठत्वाच्या पदाकरिता इंग्लंड व फ्रान्स हे दोन उमेदवार होते. पण या दोघाच्या झटापटीचा निकाल इंग्लंडतर्फे लागला. व फ्रेंच सत्तेला उतरती कळा लागली, आणि इंग्लंडची सत्ता सर्व जगात श्रेष्ठ ठरली.

**१४२ " सेव्हन इअर्स वॉर "नें इंग्लंड व फ्रान्स यांमधील वसाहती विषयक व व्यापार विषयक चुरशीचा निकाल लावून इंग्लंडचें वर्चस्व अप्रतिहतपणें प्रस्थापित केलें " या विधानाची सत्यता पारखा.**— प्रश्न १४१ पहा.

• १४३ " कोॲलिशन मिनिस्ट्रि " अथवा " मिश्रप्रधान-मंडळ " म्हणजे काय ? न्यूकॅसल व पिट यांची " जोड प्रधानगिरी " स्थापन होण्याचें कारण काय ?

कॉमन्स सभेंत ज्या पक्षाचें मताधिक्य होईल, त्या पक्षांतील प्रमुख गृहस्थाचें मंत्रिमंडळ बनविण्याचा प्रघात तिसऱ्या विल्यमच्या कारकीर्दीपासून पडला होता. साधारणपणें प्रधानमंडळांतील सर्व सभासद एकाच पक्षाचे असतात. परंतु आणीबाणीच्या वेळीं, सर्व पक्षाचें पाठबळ मिळावें म्हणून इतर पक्षाच्या प्रमुख गृहस्थांसही प्रधान मंडळांत घेण्यांत येतें. असल्या विविधपक्षघटित प्रधानमंडळाला " कोॲलिशन " अथवा मिश्र " प्रधान मंडळ " असें नाव आहे.

सप्तवार्षिक युद्ध सुरू झालें तेव्हा सर्व सूत्रें न्यूकॅसलच्या हातीं होतीं. पण युद्धासारखें खडतर काम पार पाडण्याची धडाडी त्याचे अंगीं नव्हती. त्याच्या हातून अनेक चुका घडून आल्या. त्याचे सेनापतीही कुचकामाचे होते. तेव्हा त्याचे विरुद्ध ओरड सुरू झाली. त्यावेळीं इंग्लंडला उत्साही, चाणाक्ष व कर्तबगार माणसाची जरूर होती. त्यावेळीं पिट सारखा लायक इसम दुसरा कोणीही नव्हता. तेव्हां न्यूकॅसल व पिट याना जोड प्रधान नेमण्यात येऊन न्यूकॅसलनें अंतःस्थ कारभार पहावा व पिटनें युद्धाची व्यवस्था ठेवावी अशी कामाची वांटणी करण्यांत आली.

१४४ जेम्स वुल्फ्, बॉलिंगब्रोक, व हार्ले यांजविषयीं तुम्हांस काय माहिती आहे:—

जेम्स् वुल्फ् हा उत्साही व निधड्या छातीचा असून सप्तवार्षिक युद्धांत विशेष प्रसिद्धीस आला. क्विबेकचा किल्ला घेण्याकरिता रवाना केलेल्या फौजेचें आधिपत्य याजकडे होतें. वुल्फ त्यावेळीं तापानें आजारी होता. पण आजाराकडे बिलकूल लक्ष न देतां

त्याने मॉन्टकामवर अचानक छापा घालून त्याचा पराभव केला. पण दुर्दैवाने वुल्फ व फ्रेंच सेनापती मॉटकाम हे दोघेही या युद्धात कामास आले

**हेन्री, सेंट जॉन, लार्ड बॉलिंगब्रोक** हा एक प्रसिद्ध वक्ता व मुत्सद्दी असून १७०४ ते १७०८ पर्यंत प्रधानपदावर होता. १७१३ मध्ये ओल्ड प्रिटेंडरला गादीवर बसविण्याकरिता त्याने एक कारस्थान केले पहिला जॉर्ज गादीवर आल्यावर त्याच्यावर राजद्रोहाचा आरोप ठेवून चौकशी करण्यात आल्यामुळे तो फ्रान्समध्ये पळून गेला. १७२५ मध्ये तो इंग्लंडमध्ये परत आला व वॉलपोलचा विरोधक बनला. त्याच्या आंगीं विद्वत्ता असून त्यानें लहान लहान पुस्तकेंही लिहिलीं आहेत. **हार्ले, अर्ल ऑफ ऑक्सफर्ड** हा ॲनच्या कारकीर्दीत एक प्रसिद्ध मुत्सद्दी होऊन गेला तो १७०४-१७०८ पर्यंत मंत्रिपदावर होता, १७०८ मध्ये त्या पदावरून त्याचा हकालपट्टी करण्यात आली. १७११ मध्यें तो पुन मंत्रिपदावर आला या वेळीं कॉमन्ससभेंत टोरी पक्षाचे बहुमत असून त्याला युद्ध ( स्पॅनिश सक्सेशनचें ) संपवावें असें वाटत होतें हॉउस ऑफ लॉर्ड्समध्यें व्हिग पक्षाचें मताधिक्य असून युद्ध पुढे चालविण्याच्या मार्लबरोच्या धोरणाला त्या पक्षाचा पाठिंबा होता. तेव्हा बारा उमराव नवीन बनविण्यात आले. अशा प्रकारे राजसत्तेचा उपयोग केल्याचें इंग्लंडच्या इतिहासात दुसरें उदाहरण नाहीं ही गोष्ट इतिहासात ' Creation of Twelve New Peers " या नावाने प्रख्यात आहे.

**१४५ तिसऱ्या जॉर्जला लहानपणी कशा रीतीनें वागविण्यांत आलें होतें व या वाळवयांतील शिक्षणाचा त्याचा स्वभाव आणि धोरण यांजवर काय परिणाम झाला तें सांगा —**

दुसऱ्या जॉर्जला आपल्या नातवाविषयीं विशेष प्रेम वाटत नसल्या

मुळें त्याच्या लहानपणच्या शिक्षणाबद्दल त्याने विशेष काळजी घेतली नव्हती. त्यामुळें त्याचें सर्व शिक्षण त्याच्या आईच्याच देखरेखीखालीं झालें. तिनें त्याला आपल्या जवळून मुळ च हाऊं दिलें नाहीं. यामुळे जगाचा अनुभव त्याला यत्किंचितही नव्हता व तो स्वभावानें हट्टी आणि कोता बनला. 'जॉर्ज, खरा राजा हो' असें त्याची आई त्याला नेहमीं म्हणत असे. प्रधानमंडळाच्या सल्ल्यानें न वागता आपल्या स्वतःच्याच मर्जीप्रमाणें वागावें असा तिनें त्याला उपदेश केला होता व जॉर्जनेंही तिच्या उपदेशाप्रमाणें वागण्याचें ठरविलें. यावेळीं राज्यकारभाराचीं सर्व सूत्रें व्हिग पक्षाच्या हातीं होतीं. तेव्हां त्या पक्षाचा सर्वस्वी नाश करण्याच्या उद्योगास तो प्रथम लागला. या कामीं लाचलुचपत, पदवीदान व इतर नामनांचा अवलंब करून आपल्या धोरणाला पाठिंबा देणाऱ्या सभासदांचें पार्लमेंटांत तो मताधिक्य करून घेत असे. त्याचा हट्टी स्वभाव व जगाचें अज्ञान यामुळेंच अमेरिकेंतील वसाहतींचें भांडण इतक्या थराला गेलें.

### १४६ तिसऱ्या जॉर्जच्या स्वभावाचें वर्णन करा —

तिसरा जॉर्ज स्वभावानें साधा, धार्मिक, शूर व निधड्या छातीचा होता. परंतु लहानपणच्या लाडामुळें, तो हट्टी व कोत्या मनाचा निपजला. त्याला जगाचें ज्ञान नव्हतें. त्याचा जन्म जर्मनींत झाला नसून इंग्लंडांत झाला होता व आपणाला ब्रिटन म्हणवून घेण्यांत त्याला अभिमान वाटे. त्याची वागणूक चांगली असल्यामुळें लोकांना त्याविषयीं आदर वाटत असे.

### १४७ तिसऱ्या जॉर्जच्या कारकीर्दींत व्हिगपक्षाचें वजन कमी होण्यास काय कारणें झालीं तें सांगा —

व्हिगपक्षानें हॅनोव्हर घराणें इंग्लंडच्या गादीवर आणलें असल्यामुळें त्या पक्षाबद्दल पहिल्या दोन जॉर्जना कृतज्ञता वाटे. शिवाय त्यांना

इंग्रजी भाषा येत नसून इंग्रजी चालीरीती व राज्यकारभार यांविषयीं फारच थोडी माहिती होती. त्यामुळे त्यानीं सर्व कारभार व्हिग पक्षावर सोंपविला होता. लोकांनीही त्याच पक्षाला पाठिंबा दिला होता. ( प्रश्न १२६ पहा ).

पण तिसरा जॉर्ज इंग्लंडात वाढला असून स्वत राज्यकारभार पाहण्याचा त्याचा निश्चय झाला होता. ( प्रश्न १४५ पहा ) म्हणून त्याच्या मनातून व्हिग पक्षाचें वर्चस्व नष्ट करून आपल्याला पाठिंबा देणारा एक पक्ष निर्माण करावयाचा होता. तो गादीवर आला त्यावेळीं सप्तवार्षिक युद्ध चालू होतें व पिटनें त्याला स्पेनविरुद्ध युद्ध पुकारण्याचा सल्ला दिला. पण जॉर्जनें तसें करण्याचे नाकारलें. त्यामुळें पिटनें राजिनामा दिला. काहीं काळानंतर न्यूकॅसल यानेंही त्याच मार्गाचा अवलंब केला. तेव्हा जॉर्जनें आपल्या मर्जीतल्या एका गृहस्थाचे प्रधानपदावर नेमणूक केली व टोरी पक्षानें स्टुअर्ट पक्ष कधींच सोडला होता. तेव्हा जॉर्जनें या पक्षाला विश्वासात घेतलें. पदवीदान, लांचलुचपत, अधिकाराच्या जागा देणें, वगैरे उपायांनीं त्यानें आपल्याला पाठबळ देणाऱ्या सभासदाचा पार्लमेंटमध्यें भरणा केला. या नवीन राजपक्षीय लोकांना (" King's friends " अथवा " राजाचे मित्र " असें नांव पडलें. हा पक्ष राजाला आपला पुढारी मानीत असे. अशा रीतीनें पार्लमेंट त्याच्या हातातील खेळणें बनलें. व्हिग पक्षातही फूट पडली असून त्याची लोकप्रियता कमी झाली होती. अशा रीतीनें राजा व प्रजा या दोघांचेंही पाठबळ नष्ट झाल्यामुळें तिसऱ्या जॉर्जच्या कारकीर्दींत व्हिग पक्षाचे वर्चस्व कमी झालें.

### १४८ अमेरिकेंतील स्वातंत्र्य-युद्धाचीं कारणें द्याः –

इंग्लंडात पास झालेला नॅव्हिगेशन ॲक्ट अमेरिकेंतील वसाहतीं. सही लागू करण्यात आला होता. पण तो नेहमीं मोडला जात असे-

चोरटा व्यापारही पुष्कळ चालतें असे तरी शहाण्या मुत्सद्यांनी त्याकडे कानाडोळा केला होता. वसाहतींनीही हा वेळपर्यंत मातृभूमीच्याच तंत्रानें वागत असत पण सप्तवार्षिक युद्धानंतर त्यांना शत्रूपासून भय न राहिल्यामुळें, मातृभूमीच्या मदतीची या पुढें त्यांना गरज राहिली नाहीं व त्या तिच्याशीं फटकून वागूं लागल्या व इंग्लंडातील मुत्सद्याच्या हट्टीपणामुळें हे भांडण विकोपास गेलें. सप्तवार्षिक युद्धांत इंग्लंडला वसाहतींच्या संरक्षणाकरिता पुष्कळ खर्च झाला होता. तेव्हां वसाहतींनीं हा खर्च सोसणें रास्त होय असें ग्रेन्व्हिल यास वाटून त्यानें नॅव्हिगेशन कायद्याची अमलबजावणी कसोशीनें करण्याचा हुकूम सोडला व १७६५ मध्यें स्टँप ॲक्ट या नांवाचा एक कायदा केला. या कायद्याअन्वयें जेवढे कायदेशीर कागदपत्र व्हावयाचे, त्यांना तिकीटें किंवा स्टँप लावण्यांत यावे असें ठरलें. अशा रीतीनें मिळणारें उत्पन्न वसाहतींच्या संरक्षणाकरितां खर्च व्हावयाचें होतें. पण अमेरिकन लोकांनीं या कायद्याला विरोध केला. ज्या अर्थी मातृभूमींतील पार्लमेंटमध्यें आपले प्रतिनिधि नाहींत, त्या अर्थी त्या पार्लमेंटला आम्हांवर कर बसविण्याचा अधिकार नाहीं असें त्यांनीं जाहीर केलें. यानंतरचा प्रधान रॉकिंगहॅम यानें स्टँप ॲक्ट रद्द केला पण "डिक्लेरेटरी ॲक्ट" अथवा "*अधिकारज्ञापनाचा कायदा*" पास करवून घेतला, "वसाहतींसंबंधानें कोणत्याही प्रकारचा कायदा करण्याचा पार्लमेंटला अधिकार आहे" असा या कायद्याचा आशय होता. यानंतर टाऊनशेंड नांवाच्या प्रधानानें अमेरिकेंत येणाऱ्या सहा (Six Articles Act) वस्तूंवर कर बसविला. त्या योगानें अमेरिकेंत अनेक दंगेधोपे झाले यानंतर लॉर्ड नॉर्थ हा प्रधानपदावर आला व त्यानें चहाशिवाय इतर वस्तूंवरील कर माफ केला. वसाहतींवर कर बसविण्याचा पार्लमेंटला हक्क आहे हें दाख-

सहन न होऊन त्याला घेरी आली व लौकरच त्याचा अंत झाला.

पिट हा उत्तम वक्ता व असामान्य मुत्सद्दी म्हणून प्रख्यात आहे. त्याचा आत्मविश्वास दांडगा असून तो दुसऱ्यांत उत्पन्न करण्याची हातोटी त्याच्यात विलक्षण होती. तो प्रामाणिक असून वॉलपोलच्या कारकीर्दीतील लाचलुचपतीचा त्याला तिटकारा उत्पन्न झाला होता. अनीतीच्या मोहाला तो कधींही बळी पडला नाहीं.

**१५२ धुरंधर पिट, (धाकटा,) याची मुख्य प्रधानाचे जागीं नेमणूक होण्यास कोणती कारणें घडलीं व त्यानें आपल्या कारकीर्दीत कोणत्या शांततेच्या सुधारणा घडवून आणिल्या तें सांगाः—**

रॉकिंगहॅमनंतर लॉर्ड नॉर्थ व फॉक्स यांनीं संयुक्त प्रधानमंडळ (कोॲलिशन्) बनविलें होतें. पण तें लवकरच अप्रिय झालें. राजाला ही तें आवडत नसल्यामुळें ताही तें मोडण्याची संधी पहात होता. फॉक्सनें एक इंडिया बिल आणलें. पण तें फेटाळलें गेलें, तेव्हां संयुक्त प्रधानमंडळाने राजीनामा दिला. तेव्हां जॉर्जनें पिटला आपलें मंत्रिमंडळ बनविण्यास सांगितलें. निवडणुकींत पिट यालाच बहुमत मिळालें व तो मुख्य प्रधान बनला.

पिट हा वॉलपोलप्रमाणेंच शांततावादी व सुधारणाप्रिय गृहमंत्री होता. अनेक सुधारणा करण्याचे त्याच्या मनात होतें. पण नेपोलियननें युरोपला एक क्षणभर देखील फुरसत न दिल्यामुळें पिटला अंतःस्थ सुधारणा करण्यास फारसा अवसर मिळाला नाहीं. तरी त्यानें त्यातल्या त्यात पुष्कळ सुधारणा घडवून आणल्या (१) १७८४ मध्यें इंडिया बिल पास करवून हिंदुस्थानातील कारभारावर पार्लमेंटचा ताबा मिळविला. (२) तुरुंगाची सुधारणा करण्याचे कामीं जॉन हॉवर्ड यास साहाय्य केलें. (३) गुलामाचा व्यापार बंद करण्यासाठीं त्यानें जिवा-

केला. स्वातंत्र्य, समता व विश्वबंधुत्व हें त्याचें ब्रीदवाक्य होतें. त्यामुळें अनियंत्रित राजसत्तेचा नायनाट करून प्रजासत्ताक राज्य स्थापण्याच्या कल्पना लोकांत रूढ होऊं लागल्या व अमेरिकेचें उदाहरण त्याच्या डोळ्यासमोर ताजेंच होतें. "**माऊंटेन**" या नावाचा एक जहाल क्रांतिकारक पक्ष अस्तित्वात आला व प्रचलित राज्यव्यवस्था उलथून पाडली पाहिजे असें त्यानीं लोकांच्या मनांत भरविलें. या क्रांतिकारक विचारानीं लोक इतके बिथरले कीं, १७८९ मध्यें त्यानीं **बॅस्टील** नावाचा किल्ला हस्तगत केला, राजाला कैद केले व लवकरच त्याला फांशीं दिले. उमराव व राजपक्षीय लोक याना पकडून फाशीं देण्यात आलें. अनेक अनन्वित कृत्यें करण्यात आलीं. पॅरिस येथें भयंकर कत्तल होऊन तीन दिवसात दोन हजार माणसांचे खून झाले. सर्वत्र बेबंदशाही सुरू झाली. या अमदानीला (Reign of Terror) "भीतीची अमदानी" असें नाव पडलें.

या क्रांतीचा इंग्लंडवर बराच परिणाम झाला. राज्यकर्त्यांविरुद्ध फ्रेंच लोकानीं केलेली चळवळीची बातमी ऐकून इग्लंडात पहिल्यानें सहानुभूतीपर विचार प्रगट होऊं लागले. पण लवकरच पार्लमेंटरी मुत्सद्यात द्विमत उत्पन्न झालें. बॅस्टिल किल्ला हस्तगत केल्याचें वर्तमान ऐकतांच "किती उत्तम आणि किती महत्वाची गोष्ट घडून आली" असे फॉक्सच्या तोंडून उद्गार निघाले. समता, स्वातंत्र्य, विश्वबंधुत्व या कल्पना इंग्लंडात प्रसृत करण्याकरितां अनेक मंडळ्या स्थापन करण्यांत आल्या. पण १७९० मध्यें एडमंड बर्क या विद्वान मुत्सद्यानें "फ्रान्समधील राज्यक्रांतीविषयीं कांहीं विचार" (Reflections on the French Revolution) या नांवाचें एक पुस्तक लिहून या क्रांतीचें भयंकर व हिडीस स्वरूप उजेडांत आणून लोकांना या क्रांतीचें यथार्थ ज्ञान करून दिलें. या क्रांतीकारक विचारांची लाट

इंग्लंडांत पसरूं नये म्हणून कडक उपाय योजणें पिटला भाग पडलें. सर्व सुधारणेचें पाऊल जागच्या जागींच थांबले आणि फ्रान्सविरुद्ध इंग्लडला युद्ध जाहीर करावें लागले.

**१५४ रेव्होल्यूशननंतर फ्रान्सबरोबर इंग्लंडचें युद्ध होण्याचीं कारणें सांगून त्या युद्धाची थोडक्यांत माहिती द्याः—**

फ्रान्समधील राजसत्ता उलथून पाडण्यात आल्यावर फ्रेंच प्रजेनें सर्व राष्ट्रांस " डिक्री ऑफ् डिफायन्स " जाहीर करून, राजसत्ता नष्ट करून फ्रान्सचें उदाहरण गिरविण्यास सांगितलें. ही क्रांतिकारक चळवळीची आग आपल्या देशास पसरूं नये म्हणून इंग्लंड, हॉलंड, प्रशिया, ऑस्ट्रिया, स्पेन, नेपल्स वगैरे राष्ट्रांनीं एक संघ स्थापन केला व १७९३ मध्यें युद्धाला सुरवात झाली.

हकीकतः—इंग्लिशांनीं डंकर्कला वेढा दिला. पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं. त्याचप्रमाणें नेपोलियनने **टुलोन** इंग्लिशांपासून जिंकून घेतलें. पण **लॉर्ड** हौ यानें फ्रेंच आरमाराचा पराभव करून इंग्लंडचें आरमारी वर्चस्व कायम राखिलें. फ्रेंच लोक प्राणावर उदार झाले होते व त्यांनीं इंग्लडशिवाय सर्व शत्रूंचा पराभव करून त्यांना तह करण्यास व आपल्या बाजूने लढण्यास भाग पाडिलें. तेव्हा ब्रिटिश आरमारानें स्पॅनिश आरमाराचा **केप सेंट व्हिन्सेंट** येथें व डच आरमाराचा **कॅपरडाऊन येथें** पूर्ण पराभव केला व इंग्लंडवर स्वारी करण्याचा नेपोलियनचा बेत रसातळाला गेला. यानंतर बरोबर मोठें आरमार व जंगी फौज घेऊन नेपोलियन इजिप्तमध्यें उतरला. हिंदुस्थानात येऊन टिपूला इंग्लिशांविरुद्ध मदत करण्याचा त्याचा बेत होता. पण नेल्सननें त्याचा पाठलाग करून अबूकीरबे मध्यें असलेल्या आरमाराचा **नाईलच्या लढाईत** पराभव केला. नेपोलियन इजिप्तमध्यें गेला आहे असें पाहून युरोपियन राष्ट्रांनीं फ्रान्सविरुद्ध पुनः उचल खाल्ली व

पाहून तेथील लोकांना काहीं सवलती द्याव्या असें सुधारणाप्रिय पिटला वाटूं लागलें. व त्यानें आपलें सर्व वजन खर्च करून, आयर्लंड-मधील रोमन कॅथोलिकांना उमेदवार म्हणून उभे रहाण्याचा नसला तरी मतदानाचा अधिकार असावा असा कायदा पास करून घेतला. यानंतर "युनायटेड आयरिश मेन" या संघाचें रूपांतर गुप्त मंडळा-मध्यें होऊन इंग्लंडचा संबंध तोडून टाकावा असें त्या संघाचें धोरण आखण्यांत आलें व १७९८ मध्यें आयर्लंडमध्यें एक बंड उद्भवलें. सरकारनें कडक उपाय योजून हें बंड तातडीनें मोडून टाकिलें. पण जर दोन्ही राष्ट्रांत सलोखा रहावयास पाहिजे असेल तर आयरिश लोकांना सवलती देणें व इंग्लंड आणि आयर्लंड यांच्या पार्लमेंटांचें एकीकरण करणें जरूर आहे असें पिटला वाटलें व त्यानें १८०० साली पार्लमेंटपुढें एक बिल आणून या दोन पार्लमेंटचें एकीकरण घडवून आणिलें.

कलमें—(१) चार आयरिश बिशप व २८ आयरिश उमराव असे एकंदर ३२ सभासद हाऊस ऑफ लॉर्ड्समध्यें व १०० सभासद हाऊस ऑफ कॉमन्समध्यें आयरिश लोकांनीं पाठवावे असें ठरलें. (२) या दोन राष्ट्रांमध्यें खुल्या व्यापाराची पद्धत सुरू करावी (३) आणि ग्रेटब्रिटन व आयर्लंड यासाठीं लागणाऱ्या कराचा दोन सतरांश भाग आयर्लंडनें सोसावा

आयर्लंडमधील असंतोष नाहींसा करण्याकरितां हा कायदा करण्यांत आला पण असंतोषाचें मूळ अजून शिल्लक राहिलें असल्यामुळें असंतोष नाहींसा होणें शक्य नव्हतें त्याप्रमाणें धार्मिक स्वातंत्र्य लोकांना अजूनही देण्यांत आलें नव्हतें. शेती व उद्योगधंदे यांना उत्तेजन देण्याचा प्रयत्न न झाल्यामुळें गरीब शेतकऱ्याची स्थिति सुधारली नाहीं

**१५७ दुसऱ्या नेपोलिअनिक वॉरचीं कारणें सांगून या युद्धांत घडलेल्या गोष्टींची थोडक्यांत माहिती द्याः—**

कारणें—नेपोलियन हा सर्व युरोपखंडाचा शत्रू असून त्याचा मोड केल्याशिवाय युरोपांत शांतता नांदणार नाहीं असें इंग्लंडला वाटत होतें. खुद्द त्या महत्वाकांक्षेच्या आड इंग्लंडसारख्या चिमुकल्या राष्ट्रानें यावें हे नेपोलियनला सहन न होऊन तो इंग्लंडचा द्वेष करीत होता व त्यानें इंग्लंडवर स्वारी करण्याकरितां जय्यत तयारी चालविली व एक आरमारही तयार केलें

**युद्धाची हकीकत**—वरील कारणामुळें १८०३ मध्यें युद्धाला पुन्हा सुरवात झाली नेपोलियननें हॅनोव्हर प्रांतावर स्वारी करून तो प्रांत उध्वस्त करून टाकिला १८०५ मध्यें ऑस्ट्रियाचा पराभव करून त्याला शरण यावयास लाविलें व आपल्या आरमाराला इंग्लंडवर स्वारी करण्याचा हुकूम फर्माविला. पण **ट्रॅफलगार** येथें घनघोर युद्ध

वर **सर आर्थर वेलस्ली** ( याला १८०९ मध्ये ड्यूक ऑफ वेलिंग्टन असा किताब मिळाला ) याचा नेमणूक झाला वेल्स्लीने सर्व पोर्तुगाल फ्रेंचापासून सोडविले नेपोलियनने ऑस्ट्रियाचा **वॅग्रॅम** येथें पराभव केला व पोर्तुगॉलकडे सैन्य रवाना केले पण वेलिंग्टनने **वडहोथ** व **गॉड्रिगो** हे दोन मजबूत किल्ले घेतले व फ्रेंचाचा **सालामांका** येथें पराभव केला १८१३ मध्ये त्यानें **व्हिटोरिया** येथें व १८१४ मध्ये **टुलूझ** येथें त्यानें जय मिळविले व पॅरिसवर स्वारी करण्याची तयारी केली इकडे इतके होत आहे तो युरोपच्या दुसऱ्या टोंकाला मोठी धामधूम सुरू झाली. बर्लिन डिक्राज पाळल्यामुळे रशियाचा व्यापार बसूं लागला तेव्हा त्यानें **"महाद्वीप पद्धति"** आपल्याला मान्य नसल्याचें जाहीर केलें. तेव्हा ५ लाख सैन्य बरोबर घेऊन नेपोलियन मास्को शहरावर चालून गेला पण वाटेंतील सर्व प्रदेश रशियन लोकांनीं उध्वस्त केल्यामुळे नेपोलियनच्या सैन्याचे फार हाल झाले अन्नपाणी व दाणावरण-याचा अभाव व कडाक्याचा थंडा यामुळें त्याच्या सैन्यापैकीं बहुतेक लोक मृत्युमुखीं पडले यामुळें नेपोलिअनचें सामर्थ्य कमी होऊन त्याच्या सत्तेला उतरती कळा लागली. नेपोलियनच्या सैन्याची अशी दुर्दशा पाहून प्रशिया, रशिया व ऑस्ट्रिया याच्या संयुक्त सैन्यानें त्याला घेरलें व **लिपझिग** येथे त्याचा पूर्ण पराभव केला. ( १८१३ ) लवकरच दोस्तानीं पॅरिस घेतलें व नेपोलियनला शरण यावयास लावून त्याला एल्बा बेटात कैदी म्हणून पाठविलें ( १८१३ ) —

## १६० त्रवथ्या नेपोलिअनिक युद्धाची थोडक्यात माहिती द्या —

१८१५ मध्यें नेपोलिअननें एल्वा येथून आपली सुटका करून घेतली नेपोलिअन परत आला आहे ही बातमी कळताच

आदींचे लाख सैन्य त्याच्या भोंवती गोळा झाल्य दोस्तानीं आपआपलीं सैन्यें पॅरिसकडे तातडतोब रवाना केलीं नेपोलिअनने चपळाई करून प्रशियन सेन्याला एकट गाठले व लिग्नी ( Ligny ) येथे त्याचा पराभव केला. पण डयूक ऑफ वेलिंग्टनने त्याचा वाटर्लू येथे पुरा मोड केला. ( १८१५ ) या नतर दोस्तानीं त्याला कैद करून सेंट हेलिना बेटात पाठविले.

१२६१ ( अ ) नेपोलिअनिक युद्धाचा इंग्लंडवर काय परिणाम झाला ? ( ब ) या युद्धामुळें जागतिक राजकारणात इंग्लडचें महत्व कसें वाढले तें सांगा:--

(अ) नेपोलिअनिक युद्धात अनोनात पैसा खर्च झाल्यामुळें इग्लंडचें राष्ट्रीय कर्ज वाढले. व लोकावर कराचा बोजा जास्त पडूं लागला. व्यापाराचे फारच नुकसान झाले व धान्याचे दर अत्यत वाढल्यामुळें गरीब लोकाची उपासमार होऊं लागली. युद्ध सपल्यावर सैन्यांतील शिपायाना व आरमारावरील खलाशांना कामावरून दूर करण्यात आल्यामुळें बेकारपणा वाढला. अशा रीतीनें बेकारी व असंतोष जास्त वाढल्यामुळें दगेधोपे होऊं लागले.

( ब ) अठराव्या शतकातील इग्लडचा इतिहास म्हणजे फ्रान्सबरोबर झालेल्या झटापटींचाच इतिहास होय वसाहती व व्यापार या दोनही बाबतींत या दोन देशात चुरस लागली होती. पण नेपोलियनच्या नि पातानंतर या चुरशीचा कायमचा निकाल लागला युरोपमधील अत्यत प्रबळ राष्ट्र जे फ्रान्स त्याचा पूर्ण पराभव होऊन इग्लडचें श्रेष्ठत्व अबाधितपणे स्थापित केलें गेलें. इग्लडचें आरमार अजिंक्य ठरलें व इग्लडवर स्वारी करण्यास कोणीही धजेनासा झाला अशा रीतीनें इग्लडला तुल्यबल शत्रु कोणीही न उरल्यामुळें इग्लडची भरभराट जगाच्या सर्व भागात होऊं लागली.

१६२ Write short notes on (१) वार्लिन डिक्रीज् आणि अ`डर्स इन् कौंन्सिल (२) इमॅन्सिपेशन ऑफ स्लेव्हज अथवा गुलामांची मुक्तता (३) मेथॉडिस्टस् (४) जॉन् विल्क्स:–

( १ ) ( प्रश्न १५९ पहा ) ( २ ) ॲसिएंटो करार नाम्याअन्वये नीग्रो गुलाम स्पॅनिश वसाहतींत विकण्याचा हक्क इंग्लंडला मिळालेला होता. हा व्यापार किफायतशीर असल्यामुळें त्यात पुष्काळ लोकानीं आपलें भाडवल गुतविलें या गुलमाना ते फारच निर्दयपणें वागवीत असत. मनुष्यप्राण्याला गुलाम करण्याचा कोणासही हक्क नाहीं असें पुष्कळ विचारी लोकाचे मनात येऊं लागून बुइल्यम विल्बरफोर्स या दयाशील गृहस्थानें या व्यापाराविरुद्ध जोराची चळवळ केली. पिटनें या चळवळीला पाठिंबा दिला व हा व्यापार बंद करण्याकरिता १७९२ मधें त्यानें पार्लमेंटांत एक बिल आणलें. पण गुलामाच्या व्यापारात हितसंबंध असणाऱ्या लोकांचे स्नेही पार्लमेंटांत फार असून त्यांनीं या बिलाला विरोध केल्यामुळें तें पास झालें नाहीं. पण ग्रेनव्हिल प्रधान मंडळानें हा प्रश्न पुन्हां हातीं घेतला व १८०७ मधें गुलामगिरी रद्द करण्यांत आली. पण ब्रिटिश साम्राज्यांतील सर्व गुलामाची मुक्तता १८३३ मधें झाली.

( ३ ) मेथॉडिस्ट्स्:–प्युरिटन अमलात पृथ्वीवर स्वर्ग आणण्याचा व सर्व लोकाना साधू बनविण्याचा प्रयत्न करण्यात आला. (प्रश्न ६० पहा.) पण त्यानंतर प्रतिक्रिया होऊन रेस्टोरेशन नंतर सर्व धार्मिक बंधनें तुटलीं; पवित्र आचरणाचा उपहास होऊं लागला; व लोक ऐषआरामांत गुंग होऊं लागले. (प्रश्न ६१ पहा) धर्मोपदेशकानासुद्धां स्वकर्तव्याचा विसर पडला होता. १८ व्या शतकाच्या मध्यकाळाचे सुमारास पुन्हां धार्मिक जागृतीला आरंभ झाला. या सुमारास जॉन वेस्ले, त्याचा भाऊ चार्लस् वेस्ले व त्यांचा मित्र

जॉर्ज व्हाइटफील्ड असे तीन धार्मिक पुरुष उदयास आले. त्यानीं कळकळींचीं भाषणें करून लोकांना धर्माची आठवण करून दिली. त्याच्या उपदेशाचा परिणाम विशेषतः गरीब, पापी, व हतभागी लोकांवर फारच झाला. त्याना लक्षावधी अनुयायी मिळाले व वेस्ले-यन्स या नावाचा पंथ अस्तित्वांत आला. त्यांच्या पवित्र व धर्मबद्ध आचरणावरून हें त्रिकूट "मेथॉडिस्ट्स" या नावानेंही प्रख्यात आहे.

(४) जॉन विल्कस् हा उपद्रवापी व चळवळ्या गृहस्थ नॉर्थ ब्रिटन नावाच्या एका वर्तमानपत्राचा संपादक असून, १६६३ मध्यें त्यानें मंत्रिमंडळावर सपाटून टीका केली. तेव्हां मंत्रिमंडळानें जनरल वारंट काढून विल्कस्ला अटकेंत ठेविलें. परंतु बेकायदेशीर-पणें आपल्याला पकडून ठेविल्याबद्दल विल्कस्नें स्टेट सेक्रेटरीवर फिर्याद केली व न्यायकोर्टानें विल्कस् तर्फे निकाल दिला विल्कस्ला लोकप्रियता मिळून त्याला लोकानीं पार्लमेंटमध्यें निवडून दिलें. पार्लमेंटनें त्याची निवडणूक तीन वेळां रद्द केली. पण लोकानीं त्याला तीनही वेळा पुन्हा पुन्हा निवडून दिलें. शेवटीं पार्लमेंटला माघार घ्यावी लागली. स्वतः विल्कस् हा मोठा उत्तम गृहस्थ होता अशातला भाग नाहीं. तर तो अनीतिमान व दुराचारीच होता. लोकांनीं त्याला पुन्हा पुन्हा निवडून देण्याचें कारण लोकांना विल्कस् या गृह-स्थाबद्दल वाटलेला आदर हें नसून, त्यानें जे तत्त्व मांडलें त्या तत्त्वा-बद्दल वाटलेला आदर हें होय. हा काळपर्यंत पार्लमेंटमधील भाषणें प्रसिद्ध करण्याची व त्यांवर टीका करण्याची वर्तमानपत्रांना बंदी होती. ही मनाई उठविण्याचे कामीं विल्कस्चा देशाला फारच उप-योग झाला.

१६३ धाकटा पिट (*Pitt the younger*) चें चरित्र

देऊन, स्वभाव व धोरण या बाबतींत त्याची थोरला पिट (Elder Pitt) व वॉलपोल यांच्याशीं तुलना करा —

धाकटा पिट हा अर्ल ऑफ चॅथमचा मुलगा असून त्याचा जन्म १७५९ त झाला त्याच्या कर्तबगारीची चिन्हें त्याच्या लहानपणाच दिसूं लागलीं होतीं. वयाचे १९ वे वर्षी त्याचा पार्लमेंटमध्यें प्रवेश झाला. वयाचे तेविसावे वर्षी चॅन्सेलर ऑफ दि एक्सचेकर व चोविसाव्या वर्षीच तो इंग्लंडचा मुख्य प्रधान बनला. १८०१ ते १८०४ च्या दरम्यानचा काळ सोडून तो मरेपर्यंत अधिकारपदारूढ होता. त्याच्या पूर्वी व त्याच्या नंतरहा आजपर्यंत इतका तरुण गृहस्थ इंग्लंडचा मुख्य प्रधान झालेला नाहीं — त्याचप्रमाणें त्याच्या इतका उत्तम प्रधान आजपर्यंत क्वचितच झाला असेल. स्वतःच्या मसलतीप्रमाणें जर त्याला सर्व कारभार चालविता आला असता तर इंग्लंडात आजपर्यंत जे होऊन गेले त्या सर्वांत श्रेष्ठ पदवी यासच मिळाली असती असें एक इतिहासकार ह्मणतो. आपल्या अमदानीच्या पहिल्या दहा वर्षांत त्यानें अनेक सुधारणा घडवून आणल्या. (प्रश्न १५२ पहा) व दुसऱ्या अनेक सुधारणा करण्याचा त्याचा विचार फ्रान्समधील राज्यक्रान्तीमुळें त्याला तहकूब करावा लागला. खुला व्यापार सुरू करणें, पैशाचा काटकसरीनें उपयोग करणें, तुरुंगाची सुधारणा करणें, आयर्लंड व इंग्लंड यांच्या पार्लमेंटचें एकीकरण करणें, गुलामाचा व्यापार बंद करण्याचा प्रयत्न करणें व रोमन कॅथोलिकास सवलती देण्याचा प्रयत्न करणें वगैरे त्याची मुख्य कामगिरी होय.

पिट हा दांडगा मुत्सद्दी होता. बापाच्या इतकी वक्तृत्वशक्ति व विद्वत्ता त्याचे अंगीं नव्हती, तरी चिकाटी, दृढनिश्चय व प्रतिपक्षीयास चीत करण्याची त्याची हातोटी यांत त्याचा हात धरणारा कोणीही नव्हता. तो टोरी पक्षाचा होता तरी त्याचें धोरण उदार

होतें; तो बापाप्रमाणेच उदार व निर्लोभी होता वॉल्पोलप्रमाणें तो नामांकित फडणीस ( Financier ) व शांततावादी मुत्सद्दी होता ( peace-minister ) होता अशा रीतानें वॉल्पोलचे व बापाचे सद्गुण त्याच्यात एकवटले होते वॉल्पोल व चैथम याचा त्यानें स्वत मध्यें सुंदर मिलाफ घडवून आणिला होता असे म्हणतात ( He, effected in his own person a happy compromise between Walpole & his own father ) तें सयाल धरून आहे

१६४ (१) एडमंड बर्क, (२) चार्लस् फॉक्स, (३) विल्यम विल्बरफोर्स, (४) जॉन हॉवर्ड, (५) नल्सन्, (६) नेपोलियन बोनापार्ट यांविषयीं तुम्हास काय माहिती आहे?

(१) एडमंड बर्क हा पिट व फॉक्स याचा समकालीन असून उत्तम वक्ता, विद्वान लेखक व झणझणीत टीकाकार म्हणून त्याची ख्याति आहे. १७६५ मध्यें त्याचा पार्लमेंटमध्यें प्रवेश झाला व त्यानें पिटला त्याच्या सुधारणामध्यें मदत केली. त्याला अन्याय, अनीति व जुलूम यांची चीड असे. पण या गोष्टींचा नायनाट करतांना जुन्या गोष्टी अजिबात मोडून टाकण्याच्या तो विरुद्ध होता सुधारणा क्रमाक्रमानें केली तरच ती चिरस्थायी व फलदायी होईल असें त्याचें मत होतें म्हणूनच फ्रेंच लोकांच्या आततायीपणाच्या सुधारणाचा त्यानें जोराचा निषेध केला. हे त्याचे विचार त्यानें "Reflections on the French Revolution (" फ्रेंच राज्यक्रान्तीबद्दल काहीं विचार ") या पुस्तकांत प्रकट केले आहेत. वॉरन हेस्टिंगच्या चौकशीचे वेळीं त्यानें जे त्याच्या विरुद्ध भाषण केलें त्याजबद्दल त्याची फार प्रख्याति आहे. तो १७२९ त जन्मला व १७९३ मध्यें मृत्यु पावला.

(२) चार्ल्स् जेम्स फॉक्स हाही एक उत्तम वक्ता असून तो वयाच्या १९ व्या वर्षी पार्लमेंटमध्ये शिरला तिसऱ्या जॉर्जच्या वसाहतींसंबंधीच्या अदूरदर्शी धोरणावर टीका करणारांमध्यें हा प्रमुख होता. १७८३ मध्यें लॉर्ड नॉर्थबरोबर त्यानें मिश्र प्रधान मंडळ बनविलें; पण त्याने आणलेलें "इंडिया बिल" फेटाळलें गेल्यामुळें हें मंत्रिमंडळ तावडतोब मोडलें जाऊन पिट मंत्रिपदावर आला. फ्रान्समधील राज्यक्रांतीची हकीकत ऐकल्याबरोबर "आजपर्यंत जगाच्या इतिहासांत घडलेला हा अत्यंत महत्वाचा प्रसंग होय. असे उद्गार त्याच्या तोंडून निघाले." तो व्हिगपक्षीय असून, पिटचा प्रतिस्पर्धी होता. पण गुलामच्या बंधमोचनाचे कामीं त्यानें पिटशीं सहकार्य केलें. तो पिटनंतर थोडक्याच दिवसांनीं मरण पावला.

फॉक्स हा दांडगा वक्ता असून वादविवाद करण्याची त्याची हातोटी अजब होती. असें सांगतात कीं तो बोलूं लागला म्हणजे सर्व सभागृह तटस्थ होत असे. तो उदारहृदयी असून चांगल्या व अन्यायविरोधक चळवळींस त्याची सहानुभूति असे.

(३) विल्यम विल्बरफोर्स हा उदारधी असून भूतदयेबद्दल प्रख्यात आहे. गुलामांची केविलवाणी स्थिति पाहून त्याचें हृदय कळवळत असे. मनुष्य प्राण्याला गुलाम करणें व जनावराप्रमाणें राबविणें हें अन्यायकारक असून मानव जातीला कलंक लावणारें आहे, असें त्याचें मत होतें. गुलामांच्या बंधमोचनाची चळवळ करण्यांत त्यानें आपलें सर्व आयुष्य वेचिलें. तो विल्यम पिटचा स्नेही असून त्याजकडून गुलामांच्या बंधमोचनासंबंधीं पार्लमेंटमधें एक बिल आणविलें. या बिलास जबर विरोध होऊन तें फेटाळलें गेलें. पण त्याच्या प्रयत्नास यश येऊन १८०७ मधें गुलामांचा व्यापार बंद करण्यांत आला व १८३३ मधें ब्रिटिश साम्राज्यांतून गुलामगिरी कायमची नष्ट करण्यांत आली.

व्हानपणापासूनच दृग्गोचर होऊं लागला होता. टुर्लोनच्या लढ्यांत त्याची बुद्धिमत्ता पहिल्यानें जगाच्या निदर्शनास आली. यानंतर त्यानें इटली व इजिप्त हे देश पादाक्रांत केले. व १७९९ मध्ये फ्रान्सचा पहिला कॉन्सल बनला. त्याची लोकप्रियता सारखी वाढतच होती व १८०४ मध्ये तो फ्रान्सचा बादशहा झाला. यानंतर त्यानें इंग्लंडवर स्वारी करण्याची तयारी चालविली. पण टॅफलगारच्या लढाईत नेल्सनने त्याच्या आरमाराच्या चिंधड्या उडविल्यामुळें त्याचा बेत पार ढांसळून गेला. या नतरचा त्याचा मोठा विजय ऑस्टर्लिट्झ् येथील होय. या लढाईनंतर तो अखिल युरोपचा स्वामी बनला. सर्व युरोपखंड त्याच्या पायाखालीं आले असून त्याला विरोध करण्याचें सामर्थ्य इंग्लंड शिवाय कोणत्याही राष्ट्राला नव्हतें. त्याची महत्वाकांक्षा जबर असून त्याने स्पेनच्या गादीवर आपल्या भावाला बसविण्याचा यत्न केल्यामुळें तेथें बंडे उद्भवून पेनिन्शुलर वॉरला सुरवात झाली. याचवेळीं रशियानें उचल खाल्ली. या स्वारींत नेपोलिअनचे हजारों सैनिक मृत्युमुखीं पडल्यामुळें त्याचें सामर्थ्य कमी झाले. व लिपझिग येथे संयुक्त राष्ट्रांनीं त्याचा पराभव केला. ( १८१४ ) व त्याला पकडून एल्बा बेटांत कैदेंत पाठविलें. पण नेपोलिअननें तेथून आपली सुटका करून घेतली. आपला बादशहा परत आला आहे हें ऐकताच हा हा ह्मणता सर्व फ्रान्स त्याच्या निशाणाखालीं एकवटलें. दोस्तांनींही आपआपल्या फौजा फ्रान्सकडे तावडतोब रवाना केल्या. ड्यूक ऑफ वेलिंग्टन यानें त्याचा वॉटर्लू येथें पराभव केला. नेपोलिअनला पुन्हां पकडण्यात येऊन सेंट हेलिना या बेटात मोठ्या बंदोबस्तानें कैदी म्हणून पाठविण्यांत आलें. (१८१५) या ठिकाणीं नेपोलियन मरण पावला.

नेपोलियनच्या तोडीचा दुर्दम योद्धा व कुशल सेनानायक जगांत

आजवर झाला नाहीं असे ह्मणतात. अर्वाचीन युद्धकलेचा पिता असें त्याला मानण्यांत येतें. युद्धशास्त्रज्ञ व होतकरू सेनापती त्याच्या स्वार्‍याचा अजनही अभ्यास करितात. लोकांचीं मनें आपल्याकडे कशीं ओढून घ्यावीं ही कला त्याला चांगली अवगत होती. फ्रेंच लोक त्याच्याकरिता जीव देण्यासही तयार असत. तो बारीक सारीक गोष्टीही स्वतः पहात असे व त्यावर त्याची विलक्षण वचक होती. त्याची महत्त्वाकांक्षा असमर्याद असून सर्व युरोपखंड आपल्या बोटावर नाचविण्याची त्याची मनीषा होती. पण इंग्लंडसारखा जबरदस्त आरमारी शत्रु त्याला भेटल्यामुळें त्याच्या महत्त्वाकांक्षेचा डोलारा जमीनदोस्त झाला. पण एकंदरीत तो एक असामान्य पुरुष होऊन गेला. व जगाच्या इतिहासांत आपलें नांव त्यानें अजरामर करून ठेविलें ही गोष्ट त्याचे कट्टे शत्रुही नाकबूल करीत नाहींत.

ची त्याने खटपट चालविली पण तिचा १८२१ मध्यें अंत झाल्यामुळे या लज्जास्पद प्रकरणाचा शेवट झाला

(२) ४ था जॉर्ज गादीवर आल्यावर प्रचलित प्रधान मंडळा विरुद्ध **थिसलवुड** नावाच्या एका गृहस्थाच्या नेतृत्वाखालीं कांहीं माथाफिरू लोकांनीं एक कट रचिला परंतु तो उघडकीस आला व थिसल्वुड आणि त्याच माथादार यांना पकडून फाशी देण्यात आलें या कटवाल्याच्या बैठका **कॅटो स्ट्रीट** वरील एका घरात होत असल्या-मुळे या कटाला **कॅटो स्ट्रीट कट** असें नांव पडलें

(५) **रॅबर्टपील** हा अंतःस्थ बाबींचा सेक्रेटरी असून त्यानें फौजदारी गुन्ह्यांसंबंधींच्या कायद्यांत दुरुस्ती करण्याचें मनावर घेतलें. यावेळीं जवळ जवळ दीडशें गुन्ह्यांना फांशींची शिक्षा असे. यांपैकीं कित्येक गुन्हे अतिशय क्षुल्लक होते. सहा पेन्स चोरणें किंवा मोठाले खून करणे व दरोडे घालणें यांना जवळ जवळ सारखीच शिक्षा असल्यामुळें भयंकर गुन्ह्याकडे लोकांची जास्त प्रवृत्ति होत होती. तेव्हां शिक्षेसंबंधींच्या कायद्यांत दुरुस्ती करणे आवश्यक आहे असें वाटून पीलनें नवीन कायदे पास केले. या कायद्याअन्वये खून किंवा राजद्रोह यांखेरीज इतर गुन्ह्यांना असलेली देहांतशिक्षा रद्द करण्यांत आली.

(६) यावेळीं **हस्किसन** हा बोर्ड ऑफ ट्रेडचा अध्यक्ष असून त्यानें व्यापार व उद्योगधंदे यांच्या बाबतींत पुष्कळ सुधारणा घडवून आणल्या. त्यानें जिनसांवरील कर कमी केले; कामकरी लोकांच्या संघ स्थापनेवरील निर्बंध दूर करून त्या बाबतींत त्यांना उत्तेजन दिलें; व नॅव्हिगेशन कायद्यांत सुधारणा केली. या कायद्यामुळें व्यापार व उद्योगधंदे या बाबतींत इंग्लंडची उन्नति झाली होती. पण लवकरच इतर राष्ट्रांनीं प्रत्युत्तर म्हणून इंग्लंडविरुद्ध तसे कायदे केल्यामुळें इंग्लिश व्यापाराला अडथळा येऊं लागला. तेव्हां नॅव्हिगेशन कायद्यांत घातलेला निर्बंध काढून टाकण्यांत येऊन खुल्या व्यापाराला उत्तेजन देण्यात आलें.

(७) [प्रश्न १६८ पहा].

(८) [प्रश्न १७० पहा].

(९) १८१९ मध्यें पीलनें **पिनल कोडांत सुधारणा** घडवून आणली. त्याचप्रमाणें पोलीस पद्धतीतही अनेक दोष असून त्याचें दूरीकरण करणे आवश्यक होतें. तेव्हां १८२९ त वेलिंग्टन मंत्रिमंडळानें हे दोष दूर करून **नवीन पोलीस** पद्धत अमलांत आणली.

वर्गाकरिता कायदा ) या नांवाचा एक कायदा पास करण्यांत येऊन धट्ट्याकट्ट्या लोकांस कारखान्यांत काम देण्याची व काम करण्यास अशक्त असलेल्या पंगू व वृद्ध गरीब लोकांस अनाथालयांकडून मदत देण्याची व्यवस्था करण्यांत आली.

**१७० पार्लमेंटच्या घटनेंत सुधारणा करण्याची आवश्यकता उत्पन्न होण्याचीं कारणें सांगा. हा सुधारणा कायदा पास करून घेण्यासाठीं लोकांना जो झगडा करावा लागला त्याची माहिति द्याः—**

पार्लमेंट सभेमध्यें किती सभासद असावेत, त्यांस कोणी व कसें निवडून द्यावें, मतदानाचा हक्क कोणाला असावा वगैरे बाबतींत जी पद्धति चालू होती तींत सुधारणा होणें आवश्यक होतें. प्रचारांत असलेली घटना चारशें वर्षांपूर्वी करण्यांत आली असून त्यांत अनेक दोष होते. बदललेल्या परिस्थितीला अनुरूप असे फरक त्यांत वेळोवेळीं घडवून न आणल्यामुळें तर त्या पद्धतीनें निवडलेल्या पार्लमेंटाला लोकनियुक्त प्रतिनिधिक संस्था म्हणणें ह्मणजे भाषेचा कमालीचा दुरुपयोग करण्याप्रमाणें होतें. तीन चारशें वर्षांपूर्वी मोठीं असलेलीं शहरें उध्वस्त झालीं होतीं व व्यापार आणि उद्योगधंदे यामुळें नवीन शहरें मोठेपणाला चढलीं होतीं. परंतु जुन्या शहरांचे प्रतिनिधी कमी करण्यांत आले नव्हते, किंवा नवीन शहरांना अधिक प्रतिनिधि निवडून देण्याचा अधिकार देण्यांत आला नव्हता. त्याचप्रमाणे जे प्रतिनिधि पार्लमेंटमध्यें पाठविण्यांत येत असत, ते बहुतकरून अमीरउमरावांचे हस्तक असत. कारण मतदानाचा हक्क गरीब व मध्यम वर्गांतील लोकांना फारच अल्प प्रमाणावर होता. हे

तेव्हा ही परिस्थिती बदलून टाकून नवीन घटना अमलांत आणण्याकरितां पुष्कळ दिवसापासून चळवळ सुरू झाली होती. पिटनें

या बाबतींत सुधारणा करण्याचा यत्न केला. पण त्यात त्याना फारसें यश आलें नाहीं. त्यानंतर नेपोलियनच्या घटनापूर्ण व रहस्यमय कारकीर्दीमुळें सुधारणेच्या सर्व बाता मागें पडल्या त्या नंग्या नाचाचा बहर संपल्यानंतर, लोकानीं सुधारणाची मागणी पुन्हा द्विगुणित जोरानें सुरू केली. अधिकारावर असलेल्या वेलिंग्टन मंत्रिमंडळानें सुधारणा करण्याचें साफ नाकारलें तेव्हा हें प्रधानमंडळ मोडून अर्ल ग्रेच्या धुरीणत्वाखालीं एक प्रगमनशील मंत्रिमंडळ अधिकारारूढ झालें व १८३१ मध्यें लॉर्ड रसेल यानें एक रिफॉर्म बिल सादर केलें. पण तें फेटाळलें गेल्यामुळें सदर पार्लमेंट बरखास्त होऊन पुन्हा निवडणूक झाली. यावेळीं हाऊस ऑफ कॉमन्समध्यें हें बिल प्रचंड बहुमतानें पास झालें. परंतु उमरावामध्यें प्रतिगामी धोरणाच्या सभासदांचेंच मताधिक्य असल्यामुळें त्यानीं तें फेटाळलें. तेव्हा लोकमत क्षुब्ध होऊन दंगेधोपे होऊ लागले. तेव्हा यापुढें विरोध केल्यास लोकमताचा झंझावात भयंकर परिणाम घडवून आणील या भीतीनें लॉर्डसनीं मोठ्या नाखुषीनें या बिलाला संमति दिली व अशा रीतीनें हें बिल एकदाचें पास झालें.

**१७१ (अ) १८३२ मधील रिफॉर्म बिलचीं कलमें देऊन त्याचे सर्वसाधारण परिणाम सांगा:—**

(१) २०००० लोकवस्तीपेक्षा कमी लोकवस्तीच्या बरोज तर्फे पार्लमेंट सभेंत सभासद असूं नये

(२) २०००० ते ५०००० लोकवस्तीच्या बरोजना एकेकच सभासद पाठविण्याचा हक्क असावा.

(३) अशा रीतीनं सुमारें १४३ जागांची बचत झाली; व या जागा मोठमोठ्या परगण्यात व उद्योगधंदे व व्यापार या बाबतींत पुढें आलेल्या शहरांना वाटून देण्यात आल्या.

धंदा विस्तृत प्रमाणावर होऊं लागला; व या बाबतींत मँचेस्टर शहर नावारूपास आलें. याच सुमारास लोखंड व दगडी कोळसा, या आधुनिक जगांतील अत्यंत उपयुक्त वस्तूंच्या खाणींचा शोध लागला. व बर्मिंघॅम शहराला महत्त्व प्राप्त झालें. १८ १ मध्यें मॅकॅडॅम यानें खडीच्या सडका करण्याची रीत प्रचारांत आणली. त्यामुळें रस्ते कठीण व टिकाऊ होऊन गाड्यांचा वेग वाढला. याच काळांत कालवे खणण्यांत येऊन मालाची नेआण थोडक्या खर्चांत होऊं लागली. या सर्व शोधांपेक्षां महत्त्वाचा शोध जॉर्ज स्टीफनसन यानें लावला. त्यानें १८१४ मध्यें चलनशक्ति-यंत्र ( Locomotive Engine ) शोधून काढलें व १८२९ मध्यें त्यानें आपलें सुप्रसिद्ध रॅकेट एंजिन तयार केलें व लवकरच सर्व इंग्लंडमध्यें आगगाड्यांचें जाळें पसरलें. १८१९ मध्यें वाफे या जोरावर चालणाऱ्या आगबोटीहि तयार करण्यांत आल्या. यानंतर विजेच्या योगानें संदेश पोंचविणारी तारायंत्रें अस्तित्वांत आल्यामुळें तर व्यापाराची फारच सोय झाली. १८४० मध्यें पेनी पोस्ट ॲक्ट पास होऊन एका पेनीमध्यें पत्र पाठविण्याची सोय झाल्यामुळें तर या भरभराटींत अधिकच भर पडली. या सर्व शोधांमुळें इंग्लंड हें सर्व जगांतील व्यापाराचें केंद्र बनलें. दीडशें वर्षांच्या अवधींत हा जो एकदर फरक घडून आला त्याला ' इंडस्ट्रिअल रेव्होल्यूशन " किंवा " उद्यमक्रांति " असें नाव आहे.

(२) १८३२ मध्यें रिफार्म बिल झालें तरी लोकांची सुधारणा मिळविण्याकरिता सुरू केलेली चळवळ बंद पडली नाहीं. १८३८ मध्यें "पीपल्स चार्टर" अथवा "लोकांच्या हक्कांची सनद" या नांवाचा एक खलिता तयार करण्यांत येऊन तो पार्लमेंटकडे पाठविण्यांत आला. या चळवळींत भाग घेणाऱ्या लोकांना चार्टिस्ट असें म्हणतात. या खलि-

त्यांत मुख्यत्वेंकरून अधोनिर्दिष्ट सहा गोष्टींची मागणी केलेली होती:—
(१) वयांत आलेल्या प्रत्येक माणसास मतदानाचा हक्क असावा (२) मतें बॅलट पद्धतीनें गुप्त रीतीनें मत देण्याच्या पद्धतीनें) देण्यात यावीं (३) सभासदांना मतदारची आठवण नेहमी रहावी एतदर्थ पार्लमेंटची निवडणूक वार्षिक असावी. (४) लोकसंख्येच्या प्रमाणांत पार्लमेंटमध्यें सभासद पाठविता यावे म्हणून मतदारसंघ सारखे असावे. (५) जमीनजुमला व संपत्ति यांची अट काढून टाकण्यात यावी. म्हणजे गरीबापासून श्रीमंतापर्यंत कोणासही उमेदवार म्हणून उभें राहण्यास अडचण पडूं नये. (६) पार्लमेंटच्या सभासदांचें आर्थिक नुकसान होऊं नये म्हणून त्यांना पगार देण्यांत यावा. ही चळवळ १८३७ मध्ये प्रथम सुरू होऊन दंगेधोपेही झाले. १८४८ मध्यें चार्टिस्ट लोकांनी पुन्हां उचल खल्ली व पार्लमेंटकडे पन्नास लाख सह्यां निशीं एक अर्ज पाठविला, पूर्वी दंगेधोपे झाले होते म्हणून सरकारने यावेळीं कडक बंदोबस्त ठेविला व अर्ज फेटाळून लाविला. तेव्हां ही चळवळ हळुहळु थंडावली. यापैकीं २ री ५ वी व ६ वी या मागण्या पूर्णपणें अमलांत आल्या असून ४ थी सुद्धा मान्य झाल्यासारखीच आहे.

(४) १८१५ मध्यें स्वदेशांतील धान्याचा खप व्हावा व परदेशी धान्याची आयात बंद व्हावी म्हणून कॉर्न लॉ ( धान्यासंबंधींचा कायदा ) पास करण्यांत येऊन परदेशांतील धान्यावर जबर कर बसविण्यांत आला. पण त्याचा परिणाम असा झाला कीं स्वदेशांतील धान्याचे दर व्यापाऱ्यांनीं वाढविले. त्यामुळें गरीब लोकांचे हाल होऊं लागले. तेव्हां या कराविरुद्ध लोकमत तयार होऊं लागून या करा विरुद्ध " ॲन्टि कॉर्न लॉ लीग " या नांवाचा १८३८ सालीं एक संघ स्थापन करण्यांत आला.

कॉबडेन व जॉन् ब्राइट या सुप्रसिद्ध वक्त्यांनी संरक्षित व्या-

झाली. त्यांनी बोअर लोकांचा पराभव करून ट्रान्सवाल व ऑरेंज फ्रीस्टेट हे प्रदेश ब्रिटिश साम्राज्यास जोडिले. ( १९०२ )

१७६ व्हिक्टोरिया व तदनंतरचे राजे यांचें राजकीय धोरण सां । —

पहिल्या दोन जॉर्ज राजानीं व्हिगपक्षाच्या हातीं राज्यकारभाराचीं सर्व सूत्रे दिलीं होतीं. त्यानंतर तिसऱ्या जॉर्जने व्हिगपक्षाचा वर्चस्वा कमी करून त्यानें टोरी पक्षाला अधिकारपदावर आणलें. परंतु एकाच पक्षाला पाठबळ देण्याचें धोरण व्हिक्टोरिया राणी गादीवर आल्यापासून मागें पडलें व राष्ट्रामध्यें ज्या पक्षाचें बहुमत होईल त्या पक्षाला अधिकारसूत्रें देण्याचा प्रघात पडला. त्यामुळें कोणताच पक्ष राज्यकर्त्यांवर असंतुष्ट न होता सर्व पक्षांना राज्यकर्त्यांविषयीं सारखाच आदर वाटू लागला.

१७७ Write short notes on :—

(१) लायसेन्सिंग बिल व लॉईड जॉर्ज बजेट (२) पार्लमेंटरी ॲक्ट (१९११)

(१) १९०८ मध्ये अस्क्विथ् मंत्रिमंडळानें एक लायसेन्सिंग बिल पुढे आणलें. या बिलाअन्वये सुमारें चवदा वर्षांच्या अवधींत दारू दुकानांपैकीं एक तृतीयांश दुकानांचे परवाने रद्द करण्यात यावयाचे असून, ज्यांचे परवाने रद्द होतील त्यांना नुकसानभरपाई द्यावी असें ठरलें. हें बिल कॉमन्स सभेत पास झालें पण लॉर्डांनीं तें फेटाळून लाविलें. यानंतर पुढल साली लॉईड जॉर्ज या फडनविसानें एक अंदाजपत्रक ( Budget ) तयार करून तें पार्लमेंट सभेस सादर केलें. या बजेटांत जास्ती उत्पन्नाच्या गृहस्थावर जास्त कर पडावा अशी योजना केली होती. परंतु असें करणें म्हणजे श्रीमंतास लुबाडणें होय असें पुष्कळांस वाटूं लागलें व लॉर्डांच्या

सभेनें तें फेटाळून लाविलें. पण पुढील सालीं कॉमन्स सभेनें तें बजेट पुन्हा पास केलें व पुन्हा फेटाळण्यात अर्थ नाहीं असे वाटून लॉर्डांनीही त्यास आपली संमति दिली.

(२) हाउस ऑफ कॉमन्सने पास केलेलीं पुष्कळ बिलें लार्डांच्या सभेंत फेटाळलीं जात. तेव्हां त्यांचे या बाबतींतील अधिकार कमी करण्यांत यावे असा या बिलाचा हेतु होता. "पैशासंबंधींच्या कोणत्याही बिलास ( Money Bill ) दुरुस्ती सुचविण्याचा किंवा ते फेटाळण्याचा लॉर्डस सभेला अधिकार नाहीं आणि इतर बाबतींत एखादें बिल फक्त दोन वेळाच फेटाळण्याचा अधिकार आहे. तिसऱ्या वेळीं जरी त्यांनीं तें फेटाळलें, तरी कॉमन्स सभेंत ते पास झालें असल्यास तें अखेर पास झालें असें समजण्यात यावें व एका पार्लमेंटची मुदत पाच वर्षांपेक्षा जास्त असूं नये" असें ठरलें.

**१७८ सर रॉबर्ट पील, पामर्स्टन, ग्लॅडस्टन, डिझरेली, ॲस्क्विथ, जोसेफ चेंबरलेन, बोनर लॉ, व लॉईड जॉर्ज यांचीं संक्षिप्त चरित्रें लिहा:—**

(१) सर रॉबर्ट पील या प्रख्यात मुत्सद्याचा जन्म १७८८ मध्यें झाला. यानें विद्यार्थिदशेंत ऑक्सफोर्ड येथें चांगलें नांव मिळविलें होतें. ता १८०९ मधें पार्लमेंटांत शिरला. तेथें तो आपल्या वक्तृत्वाच्या जोरावर हळु हळु पुढें आला. ता कान्झर्व्हेटिव्ह असून कॅथॉलिक निर्बंधमोचन व १८३२ च्या सुधारणांच्या कायदा याच्या विरुद्ध होता. १८४१मध्यें तो मंत्रिपदावर आला. त्यानें १८४४ मध्ये चार्टर ॲक्ट पास करून बँक ऑफ इंग्लंड देण्यात येणाऱ्या चलनी नोटांवर नियंत्रण घातलें. त्याचप्रमाणे १८४६ सालीं धान्यावरील कर अजिबात रद्द करून देशाची आर्थिक सुधारणा केली. पील या अनुयायांना पीलाइट्स् असें नांव असून लॉर्ड ॲबरडीन व ग्लॅडस्टन हे त्यांत प्रमुख होते. तो १८५० मधें मरण पावला.

(२) लॉर्ड पामर्स्टन या मुत्सद्याचा जन्म १७८४ मध्यें झाला. तो उत्तम वक्ता असून, वादविवाद करण्याची हातोटी त्याला चांगली साधली होती. त्यानें आपलें सर्व आयुष्य राजकारणांत वेंचिलें. तो १८०७ मध्यें पार्लमेंटांत शिरला व १८०९ मध्यें युद्धखात्याच्या चिटणीसाचें, १८३० मध्यें परराष्ट्रीय प्रधानाचें, १८५२ मध्यें गृहमंत्र्याचें व १८५६ ते १८५८ व १८५९ ते १८६५ पर्यंत मुख्य प्रधानाचें जागेवर त्यानें कामें केलीं. तो १८६५ मध्यें मरण पावला.

(३) ग्लॅडस्टन या नाणावलेल्या मुत्सद्याचा जन्म १८०९ मध्यें लिव्हरपूल येथें झाला तो पीलचा अनुयायी असून १८३४ मध्यें टोरी ह्मणून प्रथम प्रसिद्धीस आला व १८४५ मध्यें कलोनियल सेक्रेटरी झाला १८५२ मध्ये चॅन्सेलर ऑफ दि एक्सचेकरचे जागेवर त्याची नेमणूक झाली. १८६५ मध्यें तो कॉमन्स सभेचा पुढारी झाला. आयर्लिश प्रकरणाचा निकाल लावण्याची त्यानें बरीच खटपट केली. त्यानें टोरी ह्मणून जरी राजकारणाच्या आखाड्यांत प्रवेश केला होता तरी पुढें तो लिबरल पक्षाचा पुढारी बनला एज्युकेशन अॅक्ट, ट्रेड युनियन अॅक्ट, बॅलट अॅक्ट वगैरे अनेक उत्तम कायदे त्या या अमदानीत पास झाले. डिझरेली (पुढील पॅरा पहा) हा त्याचा प्रतिस्पर्धी असून त्या दोन मुत्सद्यांमध्यें सदैव झगडा चालू असे. हे दोनही मुत्सद्दी दांडगे वक्ते असून श्रोत्यांवर छाप पाडण्याची व वादविवादांत प्रतिपक्षीयास चीत करण्याची त्यांची हातोटी अवर्णनीय होती. दोघांनींही उत्तम वाङ्मयलेखक ह्मणून कीर्ति मिळविली आहे.

(४) डिझरेली, अर्ल ऑफ बकन्सफील्ड हा ज्यू असून, त्याचा जन्म १८०४ मध्यें झाला. त्याला लहानपणीं व्यवस्थित शिक्षण मिळालेलें नव्हतें. त्याचें पार्लमेंटमधील पहिलें भाषण १८३७

मध्यें झाले व तें इतके क्षुद्र व घाबरत असे झाले कीं तो लोकांच्या कुचेष्टेस पात्र झाला. पण पुढें हाच गृहस्थ वक्तृत्व व वादविवादपटुता याबद्दल प्रख्यात झाला. त्याने १८६८ मध्यें व पुन्हा १८७४ ते १८८० पर्यंत मुख्य प्रधानाचे जागेवर काम केलें. त्यानें अतस्थ बाबतीत पुष्कळ सुधारणा घडवून आणल्या. त्याचें परराष्ट्रीय धोरणही जोरदार असे. तो १८८१ मध्यें मरण पावला. तो कॉन्झरव्हेटिव्ह असून ग्लॅडस्टनचा प्रतिस्पर्धी होता (यापुढें वरील पॅरा पहा.)

(५) हरबर्ट हेनरी **ॲस्किथ** याचा जन्म १८५२ साली झाला. १८८६ मध्यें त्याचा पार्लमेंटात प्रवेश होऊन तो ग्लॅडस्टनच्या पक्षात दाखल झाला. १८९२ ते १८९५ पर्यंत होम सेक्रेटरीच्या व १९०५–१९०८ पर्यंत चॅन्सेलर ऑफ दि एक्सचेकरच्या जागेवर त्याने काम केलें. १९०८–१९१७ पर्यंत तो इंग्लंडचा मुख्य प्रधान होता. हल्लीं त्याला अर्ल ऑफ् ऑक्सफोर्ड करण्यात आले आहे.

(६) जोसेफ् **चेंबरलेन** हा एक बर्मिंगहॅम येथील कारखानदार असून त्याचा जन्म १८३६ मध्यें झाला. तो १८७६ मध्ये पार्लमेंटात शिरला व १८८० मध्यें बोर्ड ऑफ् ट्रेडचा अध्यक्ष झाला. १८८६ पर्यंत तो ग्लॅडस्टनच्या प्रधानमंडळात होता. पण त्याचा मतभेद झाल्यामुळें, त्यानें **युनिअनिस्ट** नावाचा स्वतंत्र पक्ष स्थापिला. १८९५ मध्ये वसाहतींचा सेक्रेटरी बनून, त्यानें त्या जागीं उत्तम कामगिरी बजावली. १९०६ नंतर प्रकृतीच्या अस्वस्थतेमुळें त्यानें कार्यक्षेत्रातून आपलें अंग काढिलें व १९१४ मध्यें मरण पावला.

(७) **बोनर लॉ** हा ग्लासगो येथील एक प्रसिद्ध व्यापारी असून तो १९०० मध्यें पार्लमेंटात शिरला व लवकरच बोर्ड ऑफ् ट्रेडचा सेक्रेटरी बनला. १९११ मध्यें तो युनिअनिस्ट पक्षाचा पुढारी झाला.

१९१५ मध्यें फर्स्टकमिशनर मेक्रेटरीचे व १९१६ मध्यें चॅन्सलर ऑफ् दि एक्सचेकरचे जागेवर त्यानें काम केलें. १९२२ मध्यें लॉईड जॉर्जचें प्रधानमंडळ मोडले गेल्यावर कॉन्झरवेटिव्ह पक्ष अधिकारारूढ होऊन बोनर लॉ हा मुख्य प्रधान बनला. यानंतर थोडक्याच दिवसांत तो मरण पावला.

(८) लॉईड जॉर्ज हा एक प्रख्यात वकील व नाणावलेला मुत्सद्दी आहे. तो उदारमतपक्षीय असून सर कॅपबेल बॅनरमनच्या मंत्रिमंडळांत तो पहिल्यानें पुढें आला. १९०८–१९१५ पर्यंत तो चॅन्सेलर आफ् दि एक्सचेकरचे जागेवर होता. फडनवीस या नात्यानें त्यानें सादर केलेले १९०९ मधील लॉईड जॉर्ज बजेट प्रसिद्ध आहे. महायुद्ध सुरू झाल्यावर युद्धविषयक सर्व जबाबदारी त्याचेवर टाकण्यात आली. गेल्या महायुद्धांत त्यानें उत्तम कामगिरी बजावून पिटप्रमाणें लौकिक संपादन केला. १९१६ पासून १९२२ पर्यंत तो इंग्लंडचा मुख्य प्रधान होता.

---*---

## भाग चवथा

—:०:—

# सामान्य प्रश्न व राज्यघटना.



१७९ ग्रेटब्रिटनचें ब्रिटिश साम्राज्यांत रूपांतर कसें झालें तें सांगाः—

टयूडर कारकीर्दिच्या अखेरीस स्पेनचा पूर्ण पराभव होऊन इंग्लंडचें समुद्रावरील वर्चस्व अप्रतिहतपणें स्थापन केलें गेलें. तेव्हां दूरदेशीं जाऊन तेथें आपला अंमल बसविण्याची व वसाहती स्थापन करण्याची इच्छा उद्भूत होणें अपरिहार्य होतें. स्टुअर्ट कारकीर्दींत उत्तर अमेरिकेंत व्हर्जिनिया, मॅसॅच्युसेट्स, न्यू हॅंपशायर, कनेक्टिकट, व्होड आयलंड, मेरीलँड, डेलिव्हेर, नॉर्थ कॅरोलिना, साउथ कॅरोलिना, पेन्सिलव्हानिया, न्यूयॉर्क व न्यूजर्सी अशा १२ वसाहती वसविण्यात आल्या व जेमेका बेट जिंकलें गेलें. १७३१ मध्यें जॉर्जिया नांवाची आणखी एक वसाहत स्थापन होऊन याच १३ वसाहतींचें पुढें अमेरिकेंतील संयुक्त राष्ट्र बनलें.

१८ व्या शतकांत फ्रेंच राष्ट्रानेंही वसाहती स्थापन करण्याचा व निरनिराळे प्रदेश आपल्या ताब्यात आणून आपलें साम्राज्य विस्तृत करण्याचा प्रयत्न केला. तेव्हां या शतकांत फ्रेंच व इंग्रज यांच्यामध्यें सदैव झगडा चालू होता. या झगड्याचें पर्यवसान फ्रेंचांचा पराभव होण्यांत होऊन त्यांच्या अमेरिकेंतील वसाहती-कॅनडा व नोव्हा-स्कोशिया इंग्लिशांना मिळाल्या व हिंदुस्थानांतील फ्रेंच वर्चस्व संपुष्टांत आलें. यानंतर थोडक्याच दिवसांत अमेरिकेंतील वसाहती मातृभूमीपासून स्वतंत्र झाल्या. त्यामुळें इंग्लंडचें पुष्कळच नुकसान

झालें. पण यानंतर हळूहळू सर्व **हिंदुस्थान** ताब्यांत आल्यामुळें या नुकसानीची भरपाई झाली. १७९५ मध्यें **सीलोन** बेटही ब्रिटिश साम्राज्यात अंतर्भूत झालें. नेपोलिअनिक वॉर्समध्ये **टोबॅगो, सेंटल्यूसिया, ट्रिनिडाड व मॉरिशस** हीं बेटें इंग्लिशांना मिळालीं. १८७३ मध्यें **ब्रिटिश कोलंबिया** आणखी काहीं नवीन प्रदेश कॅनडा प्रांताला जोडण्यात आले.

**ऑस्ट्रेलिया**मध्ये वसाहती करण्यास १८ व्या शतकाच्या अखेरीस प्रारंभ झाला. पहिल्यानें तेथे कैदी लोकांना पाठविण्यात येऊं लागलें. पण पुढें वसाहत करणाऱ्या लोकांच्या टोळ्या तेथें येऊं लागल्यामुळें गुन्हेगार पाठविणें बंद झालें व १९ व्या शतकाच्या मध्यकाळापर्यंत खंडाच्या सर्व भागांत ब्रिटिश वसाहती स्थापन झाल्या. याच सुमारास न्यूझीलंड बेटही ब्रिटिश साम्राज्यास जोडण्यांत आलें.

नेपोलियनिक वॉर्समध्यें इंग्लिशांनीं **केप कॉलनी** ही वसाहत जिंकून घेतली व आफ्रिकेंत ब्रिटिश साम्राज्याचा पाया घातला. त्यानंतर **नाताळ** ही वसाहत प्रस्थापित झाली इंग्लिश वर्चस्वाला कंटाळून बोअर लोकांनीं **ऑरेंज फ्रीस्टेट** व **ट्रान्सवाल** अशा दोन वसाहती स्थापिल्या होत्या. त्याचें झुलु लोकांपासून रक्षण व्हावें म्हणून ब्रिटिशांनीं त्या आपल्या ताब्यात घेतल्या. झुलुवॉर संपल्यावर बोअर लोकांनीं बंड करून आपलें स्वातंत्र्य परत मिळविलें. पण १८९९ मधें पुन. युद्ध उपस्थित होऊन बोअर लोकांचा पराजय झाला व त्याचे सर्व प्रांत ब्रिटिश साम्राज्यात सामील करून घेण्यांत आले. यानंतर हळुहळु **युगांडा, ब्रिटिश ईस्ट आफ्रिका, गँबिया, सिएरालीओन, सूदान** व इजिप्त हे मुलूखही ब्रिटिश वर्चस्वाखालीं आले.

**१८० एकोणिसाव्या व विसाव्या शतकांतील आयर्लंडचा इतिहास थोडक्यांत सांगा:—**

( १८०० पर्यंतच्या इतिहासाकरिता प्रश्न १५५ पहा )

इ. स. १८०० मध्यें आयरिश पार्लमेंट व ब्रिटिश पार्लमेंट यांचें एकीकरण करण्यांत आलें होतें. पण तेवढ्यानें आयर्लंडचें नष्टचर्य संपलें नाहीं. आयरिश बहुजनसमाज कॅथोलिक असून त्यांच्यावर अनेक जाचक निर्बंध घालण्यांत आले होते. आयरिश लोकांचें संघटन करण्याकरितां व त्यांच्यावरील निर्बंध काढून टाकले जावे म्हणून चळवळ करण्याकरितां सुप्रसिद्ध आयरिश वकील **डॅनिएल ओकॉनेल** यांच्या नेतृत्वाखालीं १८२३ मधें **कॅथोलिक असोसिएशन** या नांवाची एक संस्था स्थापन करण्यांत आली. सनदशीर चळवळींवर ओकॉनेल याचा पूर्ण विश्वास असून दगेधोपे व अत्याचार करणें त्याला पसंत नसे. ही चळवळ इतकी पसरली कीं कॅथोलिक लोकांना सवलती न दिल्यास बंड होण्याचा संभव आहे असें पाहून १८२९ मध्यें ब्रिटिश पार्लमेंटनें **"कॅथोलिक इमॅन्सिपेशन बिल"** पास केलें व कॅथोलिक लोकास पार्लमेंटचे सभासद होण्यासंबंधींची आडकाठी दूर करण्यांत आली. तरी ही चळवळ थांबली नाहीं. दोन्ही पार्लमेंटांचें **एकीकरण** रद्द व्हावें व आयर्लंडला **स्वराज्य** ( Home-rule ) मिळावें म्हणून ओकॉनेलनें दांडगी चळवळ सुरू केली. ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं दडपशाही अमलांत आणली. पण त्यामुळें चळवळ न दबतां अधिकच भडकली. सनदशीर चळवळीवरील लोकांचा विश्वास उडून गुप्त क्रांतिकारक मंडळ्यांची स्थापना झाली. याचवेळीं आयर्लंडमधें दुष्काळ पडल्यामुळें तर या असंतोषांत भरच पडली. आयर्लंड हें राष्ट्र लोकसत्ताक करण्याकरितां क्रांतिकारकांनीं **"फेनियन सोसायटी"** स्थापन केली. तेव्हां जबरदस्तीचा उपयोग होत नाहीं असा अनुभव सिद्ध झाल्यामुळें ब्रिटिश प्रधानमंडळानें सौम्य धोरण अंगिकारण्याला सुरवात केली.

नेत, कार्यनैपुण्यात, व वेगसामर्थ्यांत जमीनअस्मानाचें अंतर पडलें. गलबतावर युद्धसामुग्री भरपूर ठेवण्यात आली व आरमाराचें एकंदर बळ वाढलें

**१८२ ब्रिटनचें आरमारी वर्चस्व कसकसें वाढत गेलें, या आरमारी वर्चस्वाचा ब्रिटनला कसकसा उपयोग होत गेला व गेल्या महायुद्धांत ब्रिटिश आरमारानें कोणती कामगिरी बजाविली तें सांगा —**

ब्रिटिश आरमाराच्या इतिहासात पहिला संस्मरणीय प्रसंग ह्मटला ह्मणजे १३४० मालीं ब्रिटिशानीं फ्रेंचाचा स्ल्यूस येथें केलेला पराभव हाय. १६ व्या शतकात स्पेन व पार्तुगाल हीं दोन राष्ट्रें दर्यावर्दीपणात पुढारलेलीं होतीं. पण १५८८ मध्यें, अजिंक्य ठरलेल्या स्पॅनिश आरमाराचा ब्रिटिश लोकानीं पुरा निःपात केल्यामुळें, स्पेनचें समुद्रावरील वर्चस्व नष्ट होऊन इंग्लिश आरमाराचा सर्वत्र बोलबाला झाला दर्यावरील स्वामित्व प्रस्थापित झाल्यामुळें, परदेशीं वसाहती स्थापन करण्याचा व धडाडीनें व्यापारविषयक चुरशींत उडी घेण्याचा मार्ग इंग्लंडला मोकळा झाला. व पुढील कारकीर्दींत अमेरिकेंत वसाहतींचा व हिंदुस्थानात व्यापाराचा पाया घातला गेला स्पेनच्या पराभवानंतर त्याचें स्थान डच लोक पटकावू पहात होते पण क्रॉमवेलच्या कारकीर्दींत रॉबर्ट ब्लेक या प्रख्यात ॲडमिरलनें डच लोकाचा धुव्वा उडवून त्याना पुन डोकें वर काढण्यासहा जागा ठेविली नाही यानंतर १६९२ मध्ये ॲडमिरल रसेल यानें ला होग येथें फ्रेंच आरमाराचा पराभव करून, इंग्लिश खाडीवर ब्रिटनचें वर्चस्व अप्रतिहतपणें स्थापन केलें. व दुसऱ्या जेम्सच्या पुन स्थापनेला कायमचा खो दिला. स्पॅनिश सक्सेशनच्या युद्धात ब्रिटिश आरमाराच्या कर्तबगारीमुळें जिब्राल्टर व मिनॉर्का ही

मजबूत ठिकाणे मिळाल्यामुळे भूमध्यसमुद्रांत इंग्लंडचें वर्चस्व प्रस्थापित झालें. सेव्हन इयर्स वॉरमध्यें ॲडमिरल बॉस्कवन याने लॅगॉस नजीक व हॉक याने क्वाबेरानमध्ये फ्रेंच आरमाराचा पुरा फडशा पाडला. या जयामुळें इंग्लंडवर स्वारी करण्याचा फ्रान्सचा मनीषा रसातळास गेला. इतकेंच नव्हे तर अमेरिकेंतील चालल्या वसाहतींना कुमक पाठविता न आल्यामुळें त्या ब्रिटिशांनीं जिंकून घेतल्या. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतूनहा फ्रेंच वर्चस्वाची हकालपट्टी करण्यांत आली. अमेरिकेंतील स्वातंत्र्ययुद्धांत ॲडमिरल रॉडनी, ग्रिग, व इलियट यांनीं विजय संपादन इंग्लंडचा दरारा व लौकिक कायम राखला. नेपोलिआनिक वॉर्समध्ये तर ब्रिटिश आरमारा सर्वस्वाचा कळसच झाला. नेल्सनने केप सेंट व्हिन्सेंट, कॅंपरडाउन, नाईल, कोपनहेगन व ट्रॅफलगार या प्रख्यात लढायांत फ्रेंच, डच व डॅनिश *आरमाराचा नायनाट केला, नेपोलियनची इंग्लंडवर स्वारा करण्याचा* मनीषा जागच्या जागींच जिरविला व हिंदुस्थानांत साम्राज्य स्थापण्याचे त्याचें मनोराज्य ढासळून पडलें. ट्रॅफलगारच्या लढाईनंतर इंग्लंडशी समुद्रावर टक्कर देण्यास कोणीही धजावत नाहीं. या आरमारी श्रेष्ठता मुळें इंग्लंडला आपल्या व्यापाराचें व दूरदूरच्या वसाहतींचें आणि अंकित प्रदेशाचें विनधोक रक्षण करता येतें. जगांतील मुख्य मुख्य आरमारी ठिकाणे ब्रिटिशाच्याच ताब्यांत असल्यामुळें जगाचे नाकेंच त्याच्या मुठींत असतें असें ह्मटलें तरी चालेल.

गेल्या महायुद्धाचा यशस्वी रीतानें निकाल लावण्याचे कामीं ब्रिटनला आपल्या आरमाराचा फारच उपयोग झाला. त्यानें जगाच्या निरनिराळ्या भागांत सैन्य व युद्धसामुग्री पुरविण्याचें कार्य फारच तत्परतेनें केलें. आरमाराच्या मदतीखेरीज या जगद्व्यापी युद्धाला तोंड देणें ब्रिटनला जड *गेलें असतें. ब्रिटनचें आरमारी सामर्थ्य अचाट असल्यामुळें समुद्रावर*

आपला पाड लागणार नाहीं हें पाहून जर्मनीनें आपलें आरमार काज कॅनालमध्य नद करून ठेविलें आप<sup></sup> सुरक्षित ठाणें सोडून नाहेर पडण्याचा त्यानें एक दोन वेळ प्रयत्न केला, पण तेजव्यावरच खात्री पटल्यामुळें जर्मनी आरमारी स्वाराच्या भरस पडला नाहीं. आरमारी सत्तमुळ इग्लडला आपला व्यापार सुराक्षित राखता यऊन, परदेशांतून अन्नसामुग्री व सैन्य याचा पुरवठा मिळविता आला त्याचप्रमाणें जर्मन बदराची नाकेबंदी करून जर्मनीला बाहरून मिळणारा रसद बद करता आली त्यामुळेंच जर्मनी लवकर हराण झाला

१८३ What do you mean by Limited Monarchy ? Explain how monarchy came to be limited in England **नियंत्रित राजसत्ता म्हणजे काय? इंग्लंडातील राजसत्ता नियंत्रित कशी बनली तें सागा —**

राजा हाच इग्लडमधाल मुख्य राज्याधिकारी हाय सर्व राज्यकारभार राजाचेच नावाने चालतो पण स्वत च्या अखत्यारात त्याला कोणताही गोष्ट करता येत नाहा कारण त्याचा सर्व सत्ता पार्लमेंटसभेनें मर्यादित केली आहे. सर्व कायदे पार्लमेंटकडूनच केले जातात व राज्यकारभाराच्या मुख्य नाड्या म्हणजे खजिना व सैन्य याजवर पार्लमेंटचाच हुकमत चालते. अशा रीतीनें इग्लडमधील राजसत्ता पार्लमेंटच्या अकित असल्यामुळें या सत्तेला **मर्यादित राजसत्ता** ( Limited Monarchy असें म्हणतात.

राज्यकारभाराचे कामीं लोकप्रतिनिधींचा सल्ला घेण्याचा प्रघात इग्लडात प्राचीन कालापासूनच पडला होता अँग्लो सॅक्सन राजाच्या कार्ळी राजाला राज्यकारभारात मदत करण्यासाठीं एक सल्लागारमडळ असून त्याला " **विटॅनगिमॉट** " किंवा " शहाण्या लोकांचें मडळ " असें नाव होतें. नॉर्मन अमलात याच विटनचें रूपान्तर उमरावमड

व्यांत झाले. या मंडळाचा सल्ला घेण्याचा जरी प्रघात पडला होता, तरी नॉर्मन राजानीं त्याचें नियंत्रण अनेक वेळा धाब्यावर बसविलें. त्यामुळें त्रासून जाऊन प्रजेनें राजाच्या अनियंत्रित सत्तेला पायबंद घालण्याच्या हेतूने " मॅग्ना चार्टा " उर्फ " मोठी सनद " या नावाच्या एका करारनाम्यावर जॉन राजाला सही करण्यास भाग पाडलें. ( १२१५ ) या सनदेचें इग्लंदीय राज्यघटनेच्या उत्क्रांतींत फार महत्व असून तिला ब्रिटिश स्वातंत्र्याचा पाया ( Foundations of British Liberty ) असे म्हणतात. १२६५ मध्यें सायमन-डी मॉन्टफोर्ट यानें आपल्याला कारभारात मदत करण्याकरिता अमीरउमराव व निरनिराळ्या परगण्यातील प्रतिनिधि याची एक परिषद बोलाविली. या सभेलाच पार्लमेंट हा शब्द प्रथम लावण्यात आला याच सभेला सुव्यवस्थित स्वरूप पहिल्या एडवर्डनें दिलें. ( १२९५ ) यानंतर गुलाबाच्या युद्धापर्यंतच्या काळांत पार्लमेंटनें अनेक हक्क संपादन केले व आपली सत्ता हळुहळु वाढविली. पण या युद्धामुळें राष्ट्र हैराण झालें. व सर्वत्र अंदाधुंदी माजली. तेव्हां अशा अव्यवस्थेपेक्षां करडी राजसत्ता पुरवली असें वाटून लोकानीं सर्व सत्ता एकट्या राजाच्या हातीं सूत्रित केली. या युद्धात बरेचसे उमराव मारले गेले व जे उरले होते त्यांचा टयूडरानी चागलाच बंदोबस्त केला. त्यामुळें उमरावाचा राजसत्तेवरील वचक नाहींसा होऊन, राजे अनियंत्रित बनले. राष्ट्राची आणीबाणीची परिस्थिति व टयूडरांची राष्ट्रकल्याणाविषयींची कळकळ या गोष्टी लक्षात घेऊन लोकानींही त्याना विरोध केला नाहीं. पण स्टुअर्ट कारकीर्दीच्या आरंभींच ही स्थिति पालटली. परचक्राची भीति नाहींशी झाली व नुकत्याच उद्भूत झालेल्या विद्येच्या पुनरुज्जीवनामुळें लोकांच्या कल्पना विकसित झाल्या होत्या. त्यांच्यामध्यें आत्मविश्वास, स्वातंत्र्यप्रियता वगैरे गुण उत्कर्ष पावत

होते. त्यामुळें अनियंत्रित राजशासनाला मुकाट्यानें मान डोलावण्यास ते तयार नव्हते. याचवेळीं राजसत्तेच्या दुर्दैवानें स्टुअर्टांसारखे हट्टी व अरेरावी राजे गादीवर आले. त्यांनीं राजपद ईश्वरदत्त असल्याचें जाहीर करून मन मानेल तसें वागण्याचा सपाटा चालविला त्यामुळें राजसत्ता व पार्लमेंट यांच्यामध्यें अखेरपर्यंत वाद उपस्थित होऊन त्याचें पर्यवसान १६८८ च्या राज्यक्रांतींत झालें. या राज्यक्रांतीनें पार्लमेंटचें श्रेष्ठत्व सिद्ध केलें. व राजसत्ता नियंत्रित बनविली. या क्रांतीनंतर गादीवर आलेल्या राजाचें अस्तित्वच मुळीं पार्लमेंटच्या कायद्यावर अवलंबून आहे तिसऱ्या जॉर्जनें राजसत्ता पुन प्रबळ करण्याचा प्रयत्न केला. पण त्यांत त्याला म्हणण्यासारखें यश आलें नाहीं, व त्याच्या नंतरच्या राजांनी तसा प्रयत्नही केला नाहीं

**१८४ इंग्लंडमध्यें सध्या कोणती राज्यपद्धति अस्तित्वांत आहे तें सांगा :—**

इंग्लंडात सध्या अस्तित्वात असलेल्या राज्यपद्धतीचें वर्णन एका शब्दांत करता येण्यासारखें नाहीं तर या घटनेंत निरनिराळ्या पद्धतींचा चांगुलपणा एकवटलेला आहे इंग्लंडात राजसत्ता आहे. पण ती "कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुम" अशा प्रकारची सुलतानशाही नाहीं. तर राजाची सत्ता पार्लमेंटनें मर्यादित केलेली असून राजाला पार्लमेंटच्याच धोरणानें चालावें लागतें म्हणून या पद्धतीला लोकसत्ताक किंवा प्रतिनिधिसत्ताक असेंहि म्हणता येईल. पण इतर प्रजासत्ताक देश तल्याप्रमाणें इंग्लंडातील घटना निर्भेळ प्रतिनिधिसत्ताक नाहीं. तर ही लोकसत्ता, राजसत्ता व उमरावसत्ता यांनीं नियंत्रित केलेली आहे. म्हणून या पद्धतीला "सनदशीर किंवा मर्यादित लोकसत्ता" (Constitutional or Limited Democracy ) असेंहि नाव देण्यात येतें. राजा, उमरावसभा व लोकसत्ता हे इंग्लंदीय राज्ययंत्राचे

तीन मुख्य घटक असून त्याच्यामध्ये सर्व सत्ता कमी अधिक प्रमाणानें विभागली गेली आहे. म्हणून प्रचलित घटनेंत राजसत्ता (Monarchy), अभिजातसत्ता (Aristocracy) व लोकसत्ता (Democracy) याचा त्रिवेणी संगम झालेला आहे. पण यापैकीं उमराववर्ग हा प्रजेचाच एक विशिष्ट दर्जाचा घटक असल्यामुळे या पद्धतीला राजप्रजासत्ताक असें म्हणता येईल.

**१८५ What is meant by the Royal Prerogative? What are the Prerogatives of the Crown at present? How far can a king exercise them? "राजाधिकार" म्हणजे काय? सध्यां राजाला कोणत हक्क आहेत व त्यांची अंमलबजावणी त्याला कितपत करतां येते तें सांगा:—**

सध्या राजाची सत्ता जरी मर्यादित झालेली असली, तरी त्याचे पुरातन काळापासून चालत आलेले हक्क अजून शाबूत आहेत. फक्त त्याची अमलबजावणी त्याला पूर्वीप्रमाणें करता येत नाहीं. राजाच्या या स्वयंभू हक्कांना राजाधिकार (The Royal Prerogative) असें नाव आहे. इंग्लंडच्या राजाला सध्या खालीलप्रमाणें अधिकार आहेत —(१) पार्लमेंटची उत्पत्ति राजाच्या सल्लागार मंडळांतूनच झालेली आहे. त्यामुळें राजा हा या दोन्हीं सभांचें उगमस्थान असल्यामुळें, उमराव सभेंतील सभासद निर्माण करणें, पार्लमेंट बोलाविणें, तहकूब करणें अगर बरखास्त करणें, पार्लमेंटच्या कायद्याला संमति देणें अगर न देणें त्याच्या हातीं असते. त्याच्या संमतीशिवाय कोणत्याही बिलाला कायद्याचें स्वरूप येत नाहीं. (२) लष्कर व आरमार याची व्यवस्था ठेवणें; वसाहती व अंकित प्रदेश यांच्यावरील गव्हर्नरांच्या, राष्ट्रांतील सर्व खात्यांतील वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या व मुख्य प्रधानाच्या नेमणुका

करणें, राज्याच्या जमाखर्चावर देखरेख ठेवणें, नाणीं पाडणे व त्याची किमत नक्की करणें, परराष्ट्रीय राजकारण चालविणे, धर्माचा मुख्य अधिकारी या नात्याने धर्मालयावर देखरेख ठेवणें व धर्माधिकाऱ्याच्या नेमणुका करणे, लायक लोकाना पदव्या, हुद्दे, उमरावपदें किंवा पारितोषिकें देणे (या त्याच्या हक्कामुळेंच त्याला "मानसन्मानाचें उगमस्थान "Fountain of Honour" असे ह्मटले जाते) वेळोवेळीं मुख्य प्रधानाना सल्ला उत्तेजन व इशारत देणें (The Right to be consulted, to encourage and to warn), राज्यात शातता राखून, आर्थिक, धार्मिक व सामाजिक, आरोग्य विषयक, शैक्षणिक व इतर हितकर बाबतीत लोकाना योग्य वळण लावणें, बिनवारशी जमिनीची व्यवस्था ठेवणें (कारण कायद्याप्रमाणे सर्व जमीन राजाच्या मालकीची आहे) (२) लोकाना योग्य न्याय देणे. राजा हा सर्वश्रेष्ठ न्यायाधीश होय. ह्मणूनच त्याला "न्यायाचें उगमस्थान" (Fountain of Justice) असें ह्मणतात वेळप्रसंगीं अपराध्यावर दया करण्याचा, त्याची शिक्षा कमी करण्याचा किंवा रद्द करण्याचाही त्याला अधिकार आहे. (Prerogative of mercy.)

यावरून हें उघट आहे कीं तत्वतः राजाचे सर्व अधिकार अबाधित आहेत. फक्त त्याचा उपयोग त्याला पूर्ववत आपल्या मर्जीप्रमाणें वाटेल तसा करता येत नाहीं. आपल्या सर्व अधिकाराचा उपयोग तो मुख्य प्रधानामार्फत व त्याच्या सल्ल्याप्रमाणेंच करतो. सर्व गोष्टींचा मुख्य प्रधानच विचार करतो व तदनंतर त्यांबद्दल राजाला सल्ला देतो व त्याप्रमाणें राजा वर्तन करतो. ह्मणूनच "राजाच्या हातून कोणतीही वाईट गोष्ट घडत नाहीं" (the king can do no wrong) असे ह्मटलें जातें. कारण स्वतःच्या जबाबदारीवर राजानें कोणतीच गोष्ट केलेली नसते. एवढ्यावरून राजाची सत्ता निर्माल्यवत् आहे असें

मात्र सिद्ध होत नाहीं. कारण अनेक वर्षांच्या अनुभवानें पुष्कळ राजांच्या अंगीं शहाणपण व धोरणी दृष्टी या गोष्टी आलेल्या असतात. त्यामुळें त्याना अधिकारी वाणानें प्रधानाना सल्ला देण्याचा अधिकार प्राप्त झालेला असतो. त्याचप्रमाणें परराष्ट्रीय राजकारणात त्यांच्या वौकिकाचा व उच्च दर्जाचा पार्लमेंटला बराच उपयोग होतो. व्हिक्टोरिया राणीनें पामर्स्टन व लॉर्ड रसेल याना आपला सल्ला ऐकण्यास भाग पाडलें होतें. सातव्या एडवर्डची त्याच्या शांततप्रधान स्वभावामुळें ( Peace-Maker ) पर राष्ट्रांतील राज्यकर्त्यांवर बराच छाप असून त्याचा इंग्लंडला बराच उपयोग झाला.

१८६ ब्रिटिश पार्लमेंटची उत्पत्ति कशी झाली व तिच्या सत्तेंत वाढ कशी होत गेली तें सांगा:—

देशाच्या राज्यकारभारात देशांतील शहाण्या व अनुभविक लोकांच्या सल्ल्याचा फायदा घेण्याचा प्रघात इंग्लंडात पुरातन काळापासून पडला होता. ( प्रश्न १८३ पहा. ) याच कारणामुळें सॅक्सनकाळात विटनागेमॉट हा संस्था अस्तित्वात आली होती. नॉर्मन राजे उमरावाचा सल्ला घेत १२६५ मध्यें सायमन डी मॉंटफोर्ट यानें निरनिराळ्या परगण्यांतील प्रतिनिधि बोलाविले पार्लमेंट हा शब्द याचवेळीं प्रथम अस्तित्वात आला पण हल्लींच्या स्वरूपाचें पार्लमेंट पहिल्या एडवर्डनें बोलाविलें ( १२९५ ) हे पार्लमेंट मॉडेल पार्लमेंट या नावानें प्रख्यात असून यात राष्ट्रांतील सर्व वर्गांचे व सर्व परगण्याचे प्रतिनिधि बोलाविले होते या पार्लमेंटचा विशेष ह्मणजे पूर्वीच्या सल्लागार मंडळाप्रमाणें या सभेंत धर्माधिकारी, उमराव व लोक प्रतिनिधी एकत्र न बसता प्रत्यकानें आपली स्वतंत्र सभा भरविली. पण पुढें धर्माधिकारी (धार्मिक) उमराव या नात्यानें उमराव मंडळातच मिळून गेले व उमरावसभा आणि लोकसभा अशा दोनच सभा शिल्लक राहिल्या.

पांच शतकें तरी उमराव सभेची उत्पत्ति झालेली आहे. पार्लमेंटचा जन्म झाल्यावर या सभेला उमराव मंडळ (House of Lords) हें नाम मिळून प्राप्त झालें. लोकसभेच्या स्थापनेपासून या सभेचें महत्त्व हळुहळु कमी होऊं लागलें. गुलाबांच्या युद्धांत बरेच उमराव मारले गेले व जे शिल्लक राहिले त्यांची सत्ता टथूडर राजांना पार मोडून टाकली. स्टुअर्ट कारकीर्दीत लोकसभेचें प्रस्थ फारच वाढलें. क्रॉमवेलनें तर ही सभा अजीबातच बंद करून टाकली परंतु पुन: राजस्थापना झाल्यावर ही सभाही पुन: अस्तित्वांत आली. १६८८ च्या राज्यक्रांतीनंतर तर लोकसभेचें महत्त्व वाढत चाललें व १८३२ च्या कायद्यानें लोकशाहीचा उदयकाळ जाहीर केला. पुढें पुढें तर लोकसभेला या सभेकडून अनेक वेळां अडथळा होत असल्यामुळें या मंडळाचें अस्तित्व कायम ठेवावें की नाहीं असा वाद उपस्थित झाला आहे. १९११ च्या कायद्यानें या सभेचा आर्थिक बिलासंबंधींचा सर्व अधिकार काढून घेण्यांत आला व इतर बाबतींतही तिचे अधिकार फारच मर्यादित करण्यांत आले.

१८८ Describe the present Composition of the House of Lords. What are its Privileges?

**उमरावमंडळाची घटना देऊन त्याचे हक्क सांगा:—**

राष्ट्रांतील तीन प्रमुख घटकांपैकी (three Estates of Realm) दोन घटक, धर्माधिकारी (Lords spiritual) व उमराव (Lords temporal) या सभेचे सभासद असतात. सभासदांची संख्या नक्की ठरलेली नसून ती नेहमीं बदलत असते. यावर्षी (१९२७) ती ७४३ आहे. या सभेंत पिढीजाद उमराव व प्रतिनिधि उमराव असे भेद आहेत. पिढीजाद उमरावांमध्यें ड्यूक, मार्किस्, अर्ल, व्हायकाउंट, बॅरन वगैरे वरे प्रकार आहेत. या सर्वांचा दर्जा एकच नसून त्याच्या हक्कातही फेर आहे. इंग्लंडमधील सर्व उमरावांना या सभेत बसण्याचा हक्क आहे. स्कॉटलंडच्या उमरावांतर्फे १६ व आयर्लंडमधील उमरावांच्या वतीनें २ उमराव या सभेंत बसतात. बिशपांची संख्या साधारणपणें २६ असते त्याचप्रमाणें ६ प्रमुख न्यायाधीशही (Lords of Appeal) या सभेंत बसतात. या सभेला मुदत नाहीं व तिची निवडणूकही होत नाहीं. पिढीजाद उमराव मेल्यावर त्याच्या वडील मुलास या सभेंत बसतां येते. स्कॉटलंडमधील उमरावांची दर पांच वर्षांनी फेरनिवडणूक होते. पण इतर उमराव या सभेंत हयातीभर बसतात. कोणत्याही उमरावाला आपले पिढीजाद हक्क टाकून देता येत नाहींत. वयात न आलेल्या, दिवाळखोर व जबर शिक्षा झालेल्या उमरावांना या सभेचे सभासद होता येत नाहीं. लॉर्ड चॅन्सेलर हा या सभेचा अध्यक्ष असून प्रत्येक नवीन प्रधानमंडळाबरोबर त्याची नेमणूक होते. कारण तो प्रधानमंडळांतीलच एक असतो.

प्रत्येक उमरावाला राजाचें बोलावणें येण्याचा (Right to a writ

of Summons ) व सार्वजनिक कामाकरितां केव्हांही राजाची मुलाखत घेण्याचा (Right of Personal Access) अधिकार आहे. "दिवाणी अटक" व कोर्टांत पंच ( ज्यूरर ) म्हणून बोलावणें या गोष्टींपासून ते मुक्त असतात. त्याचा खटला उमरावापुढेंच चालला पाहिजे. उमरावाच्या वारसासंबंधींचा निकाल उमरावच देतात सभेची शिस्त मोडणारांना शिक्षा करण्याचा अधिकार मंडळाला आहे. सभेमध्यें बहुमतानें पास झालेला ठराव एखाद्या उमरावास पसंत नसल्यास कारणासह निषेध नमूद करण्याचा त्याला हक्क आहे.

१८९ What are the functions of the House of Lords and (b) The House of commons.

*(१) उमरावमंडळ व (२) लोकसभा यांच्या कामकाजाची माहिती द्या.—*

(१) सल्लामसलत देणे (२) कायदे करणें व (३) न्याय देणें अशीं उमरावमंडळाचीं तीन मुख्य कामे आहेत (१) उमरावमंडळ हें विटनचेंच रूपान्तर असल्यामुळें पूर्वीप्रमाणच सध्याही राजाला सल्ला देण्याचा हक्क या सभेला आहे. बहुतक उमराव बहुश्रुत असून राजकारणात मुरलेले असल्यामुळें त्याचा सल्ला फार महत्वाचा असतो. (२) "कायदेमंडळ" या नात्यानें या सभेला खास अधिकार आहेत. मात्र ते लोकसभेच्या बरोबरीचे नाहीत आर्थिक बाबतींत या सभेला मुळीच मत नाहीं. इतर बाबतीत १९११ पर्यंत दोन्ही सभाना बहुतेक समान हक्क होते. पण १९११ च्या कायद्यानें त्यांच्या हक्कावर बरेंच नियंत्रण घालण्यात आलें. आर्थिक बिलाव्यतिरिक्त इतर कोणतेंही बिल दोहोंपकीं कोणत्याही सभेंत प्रथम आणल तरी चालतें. पण महत्वाचीं सर्व बिलें प्रथम कॉमन्स सभेतच माडलीं जातात. त्यामुळें

What are its Powers and Privileges? **लोकसभेची सभ्यांची घटना सांगून तिचे अधिकार लिहा:**—

कॉमन्स सभेत सध्या एकंदर ६१५ सभासद आहेत. त्यापैकी ४९२ इंग्लंडचे, ३६ वेल्सचे, ७४ स्कॉटलंडचे व १३ उत्तर आयर्लंडचे (अल्स्टरचे) आहेत. वय २१ वर्षे असून कमीतकमी १० पौंड वार्षिक भाडें भरता येईल अशा घरांत राहणाऱ्या किंवा तितकें भाडें देणाऱ्या सर्व पुरुषांना मताधिकार आहे. मात्र त्याचें वास्तव्य त्या मतदारसंघाच्या क्षेत्रांत निदान ६ महिने तरी असलें पाहिजे त्याचप्रमाणें ३० वर्षें वयाच्या व ५ पौंड वार्षिक भाडें भरणाऱ्या अगर तितकें भाडें येणाऱ्या घराची मालकीण असणाऱ्या प्रत्येक स्त्रीस मत देण्याचा अधिकार आहे. पण कोणाही इसमाला दोहोंपेक्षा जास्त मतें देता येत नाहींत. पार्लमेंटची मुदत पांच वर्षांची आहे. पार्लमेंटच्या सभासदाला आपल्या जागेचा **राजिनामा** देता येत नाहीं. किंवा **किफायतशीर सरकारी नोकरी** धरतां येत नाहीं या नियमाला प्रधान अपवाद आहेत. प्रत्येक सभासदाला सालांना ४०० पौंड तनखा मिळतो. व त्याला M. P. (Member of Parliament) ही पदवी असते. लोकसभेच्या सभासदांना उमरावांप्रमाणेंच **भाषणस्वातंत्र्य व अटकेपासून मुक्तता** हे हक्क असतात. (Freedom of Speech and Freedom from Arrest) सभेचें काम नीट व्हावें म्हणून एक अधिकारी असतो. त्याला **स्पीकर** अशी संज्ञा आहे.

**हक्क व अधिकार:**—(१) सभेच्या हक्कांस बाध येईल अगर इभ्रतीस धक्का बसेल असें कृत्य कोणी केल्यास त्याला अटक करण्याचा अधिकार या सभेस आहे. असली अटक पार्लमेंटची बैठक संपेपर्यंतच असते. (२) सभेच्या नियमांचें उल्लंघन करणारांला किंवा

कामाला अडथळा आणणारा सभागृहांतून धाकून देतां येतें (३) वादविवादात्मक निवडणुकींचा चौकशी करून निकाल देणें ( कॉमन्स सभेच्या परनेसंबधीं सर्व प्रकारची चौकशी करणें. (४ तिजोरीसंबंधी सर्व व्यवस्था पहाणें ५) कर बसविणे किंवा रद्द करणें (६) राजमंत्र्यांनी अधिकाराचा दुरुपयोग केल्यास त्याची चौकशी करणें (७) सामुदायिकरीत्या राजाची भेट घेण्याचा अधिकार या सभेच्या सभासदास आहे उमरावांना हा हक्क व्यक्तिश आहे. (७) कायदे व त्याची अम्मलबजावणी करणें वगैरे

**१९१ हाउस ऑफ् लॉर्डस् व हाउस ऑफ् कॉमन्स् यांचे परस्पर संबंध सांगून हाउस् ऑफ् लॉर्डस्च्या उपयुक्ततेचें विवेचन कराः—**

हाउस ऑफ् लॉर्डस् ही संस्था जास्त पुरातन असून त्यात राष्ट्रांतील वडे लोक असल्यामुळें साहजिकच ती पहिल्यानें श्रेष्ठ समजली जात असे हाउस ऑफ् कॉमन्सचा दर्जा पहिल्यानें अर्जदाराइतकाच ( Petitioners ) समजला जात असे. व अजूनही राज्य भिषेकसमयीं कॉमन्स सभेचे सभासद त्याच दर्जाचे स्थानीं उभे रहातात तत्वत अशी स्थिति असली तरी प्रत्यक्ष व्यवहारात ती उलट आहे. (२) महत्वाचे बहुतेक कायदे प्रधानमंडळाकडूनच मांडण्यांत येत असल्यामुळें, ते प्रथम लोकसभेंतच मांडले जातात कारण विरुद्धपक्षाला तोंड देण्याचे प्रसंग त्याचठिकाणीं जास्त येतात (२) लोकसभेची तिजोरीवर पूर्ण सत्ता असल्यामुळें अर्थातच तिचा वरचष्मा असतो (३) मंत्रिमंडळ कॉमन्समधील बहुमतवाल्या पक्षांतील पुढाऱ्यांचे असल्यामुळें, अंमलबजावणीचीं कामें याच सभेच्या मतानुसार होतात (४) आर्थिक बिलावर उमराव सभेला मुळींच अधिकार नाहीं. इतर बाबतींत कोणतेंही बिल उमरावसभेला

फक्त दोन वेळाच फेटाळता येतें त्यानतर उमरावाच्या विरोधाला न जुमानता तें राजाच्या सहीनें पास झाल्याचें जाहीर करण्यात यतें (५) उमराव सभा ही श्रेष्ठ प्रतीचें न्यायासन आहे हा या सभचा विशेष होय.

एकसभात्मक कायदेमडळ असण्यापेक्षा द्विसभात्मक असण केव्हाही फायदेशीर असतें. याचकरिता हिंदुस्थानात लेजिस्लेटिव्ह असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टट अशीं दान मडळें स्थापित केलेला आहेत ) उमरावसभेला कोणतेंही बिल फक्त दोनच वर्षें लाबकळत ठवता येते. पण तवढ्या मुदतींत त्याना लोकमत अजमावून पहाता येतें. लोकसभेनें एखादे बिल अविचारानें पास केलें तर या सभेंत त्याच्यावर सागोपाग चर्चा होत व या चर्चेचा बिलावर अनेक वेळा परिणाम होत " उतारावरून गाडी फार वेगानें जाऊ नये म्हणून जसा ब्रेक ( Brake ) तसेंच पूर्ण विचाराशिवाय कोणतेंही बिल पास होऊ नये म्हणून या सभेची विशष जरुरा आहे " असें एकानें म्हटल आह या सभेंत अनुभविक व धोरणी मुत्सद्याचा भरणा असल्यामुळे त्याचा सल्ला फार महत्त्वाचा असतो त्याचप्रमाणें जनतेचीं गा हाणीं पुढे माडून त्याची दद लावण्याचें काम या सभेकडून होतें

या सभतील बहुतक सभासद खानदानी घराण्यातल असून ते बहुश्रुत असतात. व ते राष्ट्रकार्य स्वार्थत्यागपूर्वक व मोठ्या दक्षतेने चालवितात असा अनुभव आहे. इग्लडातील अनेक राजकारणी पुरुषाचा उदय याच सभेंत झालेला आहे

१९२ ब्रिटिश कॅबिनेटची उत्पति व उत्क्राति कशी होत गेली तें सांगा:—

राजाला सल्ला देण्याकरिता इग्लडात प्राचीन काळापासून वडें कौंसिल ( The Great council ) नावाचें एक मडळ असे. याचेंच रूपान्तर काहीं कालानें प्रिव्ही कौंसिलमध्यें झालें. पुढें पुढें सल्ला-

मसलत देणें व अंमलबजावणी करणें ही दोन्ही कामें या मंडळाकडे आलीं. पण या कौंसिलची संख्या हळूहळू वाढत चालली असल्यामुळें प्रत्यक्ष कार्याकरिता लहानशा सुटसुटीत पोट कौंसिलची जरूरी भासू लागली व त्यामुळें या कौंसिलमधील निवडक अशा विश्वासू व कर्तबगार लोकांचें प्रधानमंडळ नेमण्याचा प्रघात पडला. स्टुअर्ट कारकीर्दीत प्रधानमंडळ कोणाला जबाबदार आहेत या प्रश्नावर बरीच रण माजलीं व १६८८ च्या राज्यक्रान्तीनंतर प्रधानमंडळ पार्लमेंटलाच जबाबदार असतें हें तत्त्व प्रस्थापित केलें गेलें. यानंतर ही प्रधान मंडळाची नेमणूक राजाकडूनच होत असते पण ती राजाच्या मर्जीनुरूप होण्याचें बंद पडलें आहे ज्या पक्षाचें पार्लमेंटमध्यें बहुमत असेल त्या पक्षाच्या मुख्य पुढाऱ्याचें प्रधानमंडळ नेमण्याचा प्रघात तिसऱ्या विल्यमच्या कारकीर्दीत पडला. बहुमतवाल्या पक्षातून हें जे प्रधान मंडळ नेमलें जातें त्यालाच कॅबिनेट अशी संज्ञा आहे हॅनोव्हर घराण्यातील पहिल्या दोन राजांना इंग्रजी भाषा मुळींच अवगत नसल्यामुळें ते कॅबिनेटच्या बैठकींना हजर राहीनासे झाले. व सर्व कारभार त्यानीं मंत्रिमंडळावरच सोंपविला. पुढें हाच रिवाज रूढ झाला व सर्व कारभार प्रधानमंडळाच्या हातीं गेला. कॅबिनेट ही संस्था कोणत्याही कायद्यानें प्रस्थापित केली गेलेली नाहीं. पण केवळ रूढीच्या बळावर ती सत्ताधीश बनलेली आहे. ( The Cabinet is not established by any statute of Parliament, but has simply grown up by convention.

193 What is a Cabinet? Describe its constitution and chief Characteristics. Distinguish between a Cabinet and a Ministry.

**कॅबिनेट म्हणजे काय? तिची घटना देऊन निचे विशेष सांगा. कॅबिनेट व मिनिस्ट्री यांच्यामध्यें फरक काय?**

कॅबिनेट या शब्दाचा मूळ अर्थ 'खाजगी खोली' असा आहे पण सध्या तो शब्द प्रमुख प्रधानाच्या मंडळाला लावण्यात येतो. राजाला सल्ला देणें, कायदे करणे व त्याची अमलबजावणी करणें या राज्यकारभाराच्या महत्त्वाच्या कामामध्ये ते प्रामुख्यानें भाग घेतात हें मंडळ नुसतें प्रीव्ही कौन्सिलचें नाहीं किंवा पार्लमेंटमधील प्रमुख सभासदांचेंही नाहीं तर हें मंडळ अधिकारूढ पक्षाचें असतें. मात्र या मंडळातील सभासद प्रीव्ही कौन्सिल व पार्लमेंट या दोनही सभांचे सभासद असतात.

**घटना**—मुख्य प्रधान ( the Prime Minister किंवा the Premier ) हा या मंडळाचा अध्वर्यू असतो. तो बहुमत वाल्या पक्षाचा पुढारी असून, आपल्या पक्षातील प्रमुख गृहस्थांचें प्रधानमंडळ बनवितो कॅबिनेटच्या सभासदांची संख्या २०।२२ असते त्यांचें हुद्दे येणेंप्रमाणें — [ सात सध्याच्या ( १९२७ ) प्रधानांचीं नावें दिली आहेत ] १ मुख्य प्रधान व फर्स्ट लॉर्ड ऑफ् दि ट्रेझरी ( स्टॅनले बाल्डविन् ) २ लॉर्ड प्रीव्ही साल ( दि मार्किस ऑफ् सॉलिसबरी, ३ प्रिव्ही कौन्सिलचा अध्यक्ष ( दि अर्ल आफ बाल्फोर ) ४ लॉर्ड चॅन्सेलर (व्हायकाउट केव्ह) ५ चॅन्सेलर ऑफ दि एक्सचे कर (विन्स्टन चर्चिल) ६ गृहमंत्री ( सर डब्ल्यू जॉयन्सन हिक्स ) ७ कलोनिअल सेक्रेटरी ( अमेरी ) ८ सेक्रेटरी ऑफ् इंडिया ( व्हायकाउट बर्कनहेड ) ९ युद्धमंत्री ( सर एल वॉर्दिंगटन इव्हॅन्स ) १० वैमानिक मंत्री (सर सॅम्यएल होअर) ११ फर्स्ट लॉर्ड ऑफ् दि अॅडमिरल्टी ( डब्ल्यू.सी. ब्रिजमन ) १२ शिक्षणमंडळाचा अध्यक्ष ( लॉर्ड यूस्टेस पर्सी ) १३ व्यापार मंडळाचा अध्यक्ष ( सर फिलिप् कुनलिफ् लीस्टर् ) १४ आरोग्यमंत्री (नेव्हिल चेंबरलेन ) १५ शेतकी मंत्री ( एडवर्ड वुड ) १६ स्कॉटलंडचा सेक्रेटरी ( सर जॉन् गिल्मूर् )

१७ मजूरखात्याचा मंत्री ( सर आर्थर स्टील मेटलंड ) १८ दि फर्स्ट कमिशनर ऑफ् वर्क्स (व्हायकाउट पील.) १९ चॅन्सेलर ऑफ् दि डॅची ऑफ् लॅंकेस्टर (व्हायकाउट सेसिल) २० अटर्नी जनरल (सर डगलस हॉग).

वैशिष्ट्यः--(१) कॅबिनेटच्या बैठकींना राजा हजर रहात नसल्यामुळें, तेथील चर्चा निर्भीडपणे चालते. प्रधानाना दडपण किंवा संकोच वाटत नाहीं (२) सर्व प्रधान पार्लमेंटचे सभासद असून ते बहुसंख्याक पक्षातूनच निवडलेले असतात (३) सर्व प्रधान एकाच पक्षाचे असल्यामुळें सर्व कारभार एकदिलानें चालतो. (४) सर्व सूत्रें मुख्य प्रधानाच्या हातात असून इतर प्रधान त्याच्या तंत्रानेंच चालतात. त्याच्याशीं मतभेद झाल्यास त्याला राजिनामा द्यावा लागतो (५) कॅबिनेटचे प्रधान पार्लमेंटला सामुदायिक रीत्या जबाबदार असतात म्हणजे पार्लमेंटचा जर कोणत्याही प्रधानावरचा विश्वास उडाला तर तो प्रधान एकटाच राजिनामा देत नाहीं, तर सर्व प्रधानमंडळानें राजिनामा दिला पाहिजे कारण कॅबिनेटनें ठरविलेले धोरण एका व्यक्तीचें नसून सर्व कॅबिनेटचें असतें (६) जोंपर्यंत एकाद्या प्रधान मंडळाला पार्लमेंटमधील बहुमताचें पाठबळ असतें तोंपर्यंतच तें सत्ताधीश असतें.

कॅबिनेट व मिनिस्ट्री हीं दोन्ही एकच नाहींत कॅबिनेटमध्ये फक्त प्रमुख अशा २०—२२ प्रधानांचाच अंतर्भाव होतो. पण या प्रमुख प्रधानाना सेक्रेटरी, अंडर सेक्रेटरी वगैरे दुय्यम मदतनीस पुष्कळच असतात. मिनिस्ट्रीमध्यें या सर्वांचा समावेश होतो. मिनिस्ट्रीमध्यें साधारणपणें ६०-७० सभासद असतात. हे सर्व सभासद कॅबिनेटच्याच धोरणाचा पुरस्कार करतात. व कॅबिनेटनें राजिनामा दिल्यास यांनाही राजिनामा द्यावा लागतो. थोडक्यात असें म्हणता येईल कीं

**कॅबिनेट ही मिनिस्ट्रीची पोटकमिटी होय.**

**१९४ State the position and functions of the Premier in the British Constitution. इंग्लंदीय राज्यघटनेंत मुख्य प्रधानाचा दर्जा सांगून त्याचीं कामें लिहा:-**

हॅनोव्हेरियन घराण्यातील पहिले दोन राजे कॅबिनेटच्या बैठकींना गैरहजर राहूं लागल्यामुळें मंडळाच्या अध्यक्षस्थानीं मुख्य प्रधानालाच नेमण्याचा प्रघात पडला. त्यामुळें अर्थातच त्याचें महत्त्व वाढलें व पहिलें प्रधानपद वॉलपोल या कर्तबगार गृहस्थाच्या हातीं जाऊन त्यानें त्या जागेचा दर्जा व इभ्रत हीं नीट वाढविलीं. हल्लीं राज्यकारभाराचीं सर्व सूत्रें मुख्य प्रधानाच्याच हातीं असतात. म्हणूनच मुख्य प्रधान हा कॅबिनेटचा, कॅबिनेट पार्लमेंटचा, व पार्लमेंट राजसत्तेचा अर्क होय असें म्हटलें जातें. (The Prime minister is the crystallization of the Cabinet, the Cabinet is crystallized Parliament, and Parliament is Monarchy crystallized) मुख्य प्रधान हा इंग्लंडच्या राज्ययंत्रांतील निरनिराळे घटक जोडणारा एक दुवा किंवा सूत्रमणी व राज्यघटनारूपी कमानींतील मधला चिरेबंदी दगड (Keystone of the arch) होय. मुख्य प्रधान हा राष्ट्रांतील अमलबजावणी खात्यांतील श्रेष्ठ सत्ताधारी होय. एखाद्या अनियंत्रित बादशहाला देखील ज्या गोष्टी करणें कठीण जातें त्या त्या सहज करूं शकतो. पार्लमेंटनेच जरी त्याला अधिकार पदावर प्रस्थापित केलें असलें, तरी प्रसंगाविशेषीं पार्लमेंट बरखास्त करण्याचा सल्लाही राजाला तो देऊं शकतो.

मुख्य प्रधान हा कार्यकारी मंडळाचा अध्यक्ष, कायदेमंडळाचा प्रमुख, जनतेच्या मुख्य पुढारी व राजाचा खास सल्लागार व प्रतिनिधि असतो. त्यामुळें सरकारी धोरण आखणें, कायदे करणें, रद्द करणें अगर दुरुस्त करणें, कर बसविणें वगैरे सर्व बाबींचा त्याला सांगोपांग विचार करावा लागतो. अंमलबजावणीच्या सर्व खात्यावर त्याची सर्व

साधारण देखरेख असून महत्त्वाच्या बाबतींत त्याचा सल्ला घेतल्या-शिवाय इतर प्रधान कार्य करीत नाहींत. राजा व पार्लमेंट यांचे परस्परसंबंध व विचारविनिमय घडवून आणण्याचें काम याच्याकडेच असून परराष्ट्रीय राजकारणांतील महत्त्वाचा पत्रव्यवहार याच्या नजरे-खालून जावा लागतो इतकीं अनेकविध कामें त्याला करावयाचीं असल्यामुळे तो कोणतेंही खातें स्वतःकडे प्रत्यक्षपणें घेत नाहीं पण मुख्य प्रधानाचें जागेला पगार नसल्यामुळें नावा । एखादे कमी जबा-बदाराचें पण पगारी खातें तो घेतो. बहुतेक प्रधान "फर्स्ट लॉर्ड ऑफ दि ट्रेझरी" हा हुद्दा स्वीकारतात.

१९५ Write short notes on — टिप्पणें लिहा.— (१) प्रीव्ही कौंसिल (२) स्पीकर (३) पक्षभेदात्मक राजकारणापासून फायदे.

(१) प्रीव्ही कौंसिल या शब्दाचा अर्थ राजाचें खासगी सल्ला-गारमंडळ असा आहे. ॲंग्लोसॅक्सन राजांचें विटन व नॉर्मन राजाचें ग्रेट कौंसिल या दोन मंडळांतूनच या कौंसिलाची उत्पत्ति झाली व हें नांव १५ व्या शतकांत रूढ झालें याचें मूळचें काम सल्ला देण्याचें असलें, तरी पुढें हळूहळू अंमलबजावणीचें कार्यही त्याच्याकडे आलें. पुढें जसजसें पार्लमेंटचें वर्चस्व वाढत गेलें तसतसें या कौं-सिलचें महत्त्व कमी झालें. त्याचें कार्यकारित्व सध्या कॅबिनेटच्या हातीं गेलें आहे

या मंडळाचे सध्या अजमासे ३०० सभासद आहेत. या सर्वांना "प्रीव्ही कौंसिलर" (P C) ही पदवी आपल्या नावापुढें व नेक नामदार ( Right Honourable ) ही पदवी आपल्या नावामागें लावण्याचा अधिकार आहे. या कौंसिलमध्यें साधारणपणे सर्व प्रकारचे प्रमुख व प्रतिष्ठित लोक असतात. ते

येणेप्रमाणे —राजघराण्यातील लोक, आर्चबिशप, ड्यूक पूर्वीच्या व चालू असलेल्या प्रधानमंडळातील प्रधान हिंदुस्थान व वसाहती येथें प्रसिद्धीस असलेले कांहीं मुत्सद्दी व अधिकारी प्रमुख न्यायाधीश, व दशान अनेक बाबतींत प्रख्यातीस आलेले कर्तबगार व बुद्धिमान् लोक वगैरे. या कौंसिलच्या अध्यक्षाला लॉर्ड प्रेसिडेंट ऑफ् द कौंसिल असें म्हणतात व तो कॅबिनेटपैकींच एक असतो. या कौंसिलचीं कामें मुख्यतः दोन प्रकारचीं असतात (१) **राजाला सल्लामसलत देणें.** हें काम पूर्णपणें कॅबिनेटमार्फतच चालतें. कारण कॅबिनेटचे सर्व प्रधान या कौंसिलचे सभासद असतात. (२) **न्याय देणें.** प्रीव्ही कौंसिल हें ब्रिटिश साम्राज्यांतील वरिष्ठ हायकोर्ट होय. त्यांच्या कोर्टाविरुद्ध अपिलें या ठिकाणीं चालतात. हें न्यायदानाचें काम करण्याकरितां कौंसिलची एक पोट कमिटी असते. तिला **न्यायमंडळ** (Judicial Committee of the Privy Council) असें नाव आहे.

च मार्ग भिन्न भिन्न असतात. त्यामुळें अर्थातच पक्षोपपक्ष निर्माण होतात. विशेषतः दोन विरोधी पक्ष असणें फायदेशीर असतें, कारण प्रत्येक पक्षाची दुसऱ्याला खालीं पाडून स्वतः अधिकारारूढ होण्याची मनीषा असते त्यामुळें प्रत्येक पक्ष आपली कार्यक्षमता व लोकहित-तत्परता वाढविण्याचा प्रयत्न करतो. दुसऱ्या पक्षाचीं व्यंगें व दोष बाहेर काढून तें चव्हाट्यावर मांडणें व त्यांच्यावर जोरकस टीका करणें हें काम प्रत्येक पक्ष मोठ्या उत्साहानें व ईर्षेनें करतो. तेव्हां विरुद्ध पक्षाला ( Opposition ) असली संधि मिळू नये एतदर्थ अधिकारा-रूढ पक्षाची ( Party in power ) सदैव खटपट चालू असते. या सर्व गोष्टींचा परिणाम असा होतो कीं राज्यकारभार चोख रीतीनें चालविला जातो.

## ९६ कॉमन्स सभा खरोखर लोकमतनिदर्शक व्हावी एतदर्थ करण्यात आलेल्या प्रयत्नांचा इतिहास थोडक्यांत सांगा —

१५, १६, १७ व १८ या शतकांत पार्लमेंटनें अनेक हक्क संपादन केले होते. पण कॉमन्स सभेच्या अंतःस्थ घटनेंत कांहींच फरक घडवून आणला नव्हता. या चार शतकांत इंग्लंडमधील परिस्थितींत जमीन अस्मानाचें अंतर पडलें होतें जुनीं मोठीं शहरें रसातळास जाऊन नवीन शहरें उदयास आलीं होतीं तेव्हां मतदार संघाचा नवीन परिस्थितीला अनुरूप अशी रचना करणें जरूर होतें (प्रश्न १७० पहा.) तेव्हां पिटनें रॉटन व पॉकेट बरोंचे मतदानाचे हक्क काढून ते मोठ्या शहरांना व कउंटींजना देण्याचा यत्न केला. पण या बाबतीत महत्वाचा पहिला प्रयत्न १८३२ सालीं झाला. या सालच्या रिफॉर्म बिलानें मतदार संघ विस्तृत केला व ज्या ठिकाणची वस्ती कमी झाली होती अशा बरोजचे १४३ प्रतिनिधी कमी करून ते नवीन

महत्त्व पावलेल्या बरोजना वांटून दिले (प्र. १७१ पहा.) या बिलानें व्यापारी व मध्यम वर्गाचा पार्लमेंटमध्ये शिरकाव झाला. यानंतर १८६७ मध्यें दुसरा रिफॉर्म ॲक्ट पास होऊन शहरांतील कामकरी वर्गाला मतदानाचा हक्क मिळाला व मजूर वर्गाचा पार्लमेंटमध्यें प्रवेश होण्यास सुरवात झाली. १८८४ मध्यें तिसरा रिफॉर्म ॲक्ट पास होऊन खेड्यांतील शेतकरी लोकांना पार्लमेंटमध्यें आपले प्रतिनिधि पाठविण्याचा हक्क मिळाला. १९१८ मध्यें "रिप्रेझेंटेशन ऑफ् पीपल्स ॲक्ट" हा महत्वाचा कायदा पास होऊन मतदारसंघ पुष्कळच विस्तृत झाला. इतका कीं जवळ जवळ २ कोटी माणसांना म्हणजे लोकसंख्येच्या निम्मे लोकांना मतदानाचा हक्क मिळाला. त्याचप्रमाणें १९१९ सालीं स्त्रियांसही मतदानाचा व पार्लमेंटचे सभासद होण्याचा अधिकार देण्यात आला.

**इंग्लंडमधील निरनिराळे राजकीय पक्ष केव्हां व कसे निर्माण झाले, त्यांची उत्क्रान्ति कशी होत गेली, त्यांच्या धोरणांत काय फरक आहे व त्यापैकीं कोणते पक्ष सध्यां अस्तित्वांत आहेत ते सांगाः —**

पहिल्या चार्लसच्या कारकीर्दीत जेव्हा राजा व पार्लमेंट यांच्या मध्यें यादवी सुरू झाली तेव्हा राजाचा बाजू घेणार व पार्लमेंटची बाजू घेणार असे दोन तट पडले. पार्लमेंटपक्षीय लोकांना "राउंड हेड्स्" व राजपक्षीय लोकांना "रॉयलिस्टस्" अशीं नांवे पडलीं. दुसऱ्या चार्लसच्या कारकीर्दीत त्याच्या पश्चात कॅथोलिक-पंथीय जेम्सला गादी मिळू नये म्हणून शॅफ्टसबरीनें एक्सक्लूजन बिल पार्लमेंटमध्यें आणलें. तेव्हा ते पास होण्यापूर्वीच चार्लसनें घाईघाईनें पार्लमेंट बरखास्त केलें तेव्हां "पार्लमेंट पुन्हां बोलवावें म्हणून राजाकडे अर्ज करावा" अशा मताच्या लोकांना **पिटिशनर्स** व या मताचा तिटकारा वाटणाऱ्या लोकांना **अॅबोहरर्स** अशीं नांवे पडलीं.

याच वेळी या दोन पक्षांतील लोकांनीं एकमेकाला खिजविण्याच्या उद्देशानें "विग" व "टोरी" हीं टोपण नांवें प्रचारांत आणलीं. विग हे नाव पहिल्या प्रथम स्कॉटलंडमधील माथेफिरू लोकांना लावण्यांत येत असून दस या चार्लसच्या कारकीर्दींत राजाला विरोध करणाऱ्या पक्षाला हें नाव लावण्यांत येऊं लागलें. त्याचप्रमाणें टोरी हे नाव प्रथमतः आयर्लंडमधील न्यायबाह्य लोकांना लावण्यांत येत असून, त्याच कारकीर्दींत ते राजपक्षीय लोकांना लावण्यांत येऊं लागलें. पुढें पुढें प्रत्यक्ष राजसत्ता या दोन पक्षांमध्यें विरोध उत्पन्न होऊन एका या उलट दुसऱ्याच्या धारणा असावे असें ठरल्यासारखें झालें, धार्मिक बाबतींत सवलतीच धारण असावें असें व्हिग पक्षास वाटत असून टोरी पक्षाचें मत तद्विरुद्ध होतें. राजसत्ता नियंत्रित असावी असें व्हिग पक्षाला वाटत असून "लोकांनीं राजाच्या मताप्रमाणें वागावें" असें टोरींचें मत असे. व्हिग पक्षाचा हॅनोव्हर घराण्याकडे ओढा असून टोरी पक्षाला स्टुअर्ट घराण्याची पुन: स्थापना पाहिजे होता. व्हिग पक्षाचें धोरण साधारणपणें पुरोगामी असे व टोरी सभासद बहुतकरून प्रतिगामी धोरणाचे असत.

१८३४ मध्ये पील हा मुख्य प्रधानाचे जागेवर आल्यावर टोरी पक्षानें पुरोगामी धोरण स्वीकारलें व कॉन्झरव्हेटिव्ह हें नांव धारण केलें. राज्यपद्धतींत एकदम भरमसाट सुधारणा करणें इष्ट नसून क्रमाक्रमानें व पायरीपायरीनेंच सुधारणाचें कार्य करावें असें धोरण त्यानें स्वीकारलें. त्याचप्रमाणें व्यापारविषयक बाबतींत या पक्षानें "संरक्षक पद्धतीचा" स्वीकार केला. याचवेळीं व्हिगपक्षानें लिबरल हें नांव धारण करून, खुल्या व्यापाराच्या पद्धतीचा पुरस्कार केला व पार्लमेंटची राज्यघटना, मजूरवर्ग व गुलाम यांचा सुधारणा करण्याचें धोरण जाहीर केलें.

१८८६ च्या सुमारास "आयरिश होमरूलचा" प्रश्न विशेष प्रामुख्यानें पुढे आला. तेव्हां आयर्लंडला होमरूल देऊन पूर्वीप्रमाणें स्वतंत्र पार्लमेंट स्थापावें, कीं दोन्हीं पार्लमेंटाचें १८०० मध्ये झालेलें एकीकरण कायम ठेवावें या प्रश्नावर मतभेद होऊन "आयरिश होमरूलर्स" "विरुद्ध "युनिअनिस्ट" नांवाचा एक नवीन पक्ष उदयास आला. एकीकरण (Union) कायम ठेवावें अशा मताचा हा पक्ष असून यांत लिबरल व कॉन्झरव्हेटिव्ह अशा दोनही पक्षांतील लोक सामील झाले.

१८६७ च्या रिफॉर्म ॲक्टानें मजूर वर्गाचा पार्लमेंटमध्यें शिरकाव झाला. लिबरल पक्ष उदारमतवादी असून मजूर वर्गाच्या हितसंबंधाकडे त्याचें लक्ष असल्यामुळें पुष्कळ दिवसपर्यंत मजूर सभासदांचा निराळा पक्ष नसून, ते लिबरल पक्षांतच अंतर्भूत होत असत. पण १९०१ च्या सुमारास आपल्या हितसंबंधाकडे जास्त लक्ष देण्याच्या हेतूनें मजूर सभासद लिबरल पक्षांतून फुटले व त्यांनी आपला स्वतंत्र पक्ष स्थापन केला.

इंग्लंडच्या राजकारणांत सध्या कॉन्झरव्हेटिव्ह, मजूर व लिबरल हे तीन पक्ष विशेष प्रमुख आहेत. लिबरल पक्ष हळुहळु फारच कमकुवत होत आहे.

**१९८. १९ व्या शतकांतील युरोपिअन राजकारणांत इंग्लंडनें कसकसा भाग घेतला तें सांगा:—**

ट्यूडर अमदानींत इंग्लंडचा बराचसा वेळ स्वतःचें राष्ट्र कार्यक्षम व सुसंघटित करणें आणि परचक्रापासून स्वतःचें संरक्षण करणें यांतच गेला. स्टुअर्ट कारकीर्दीत अंतःस्थ भांडणांमुळें घराबाहेरील घडामोडींकडे लक्ष देण्यास इंग्लंडला मुळींच फुरसत मिळाली नाहीं. अंतःस्थ भानगडी संपतात न संपतात तोंच फ्रान्स व इंग्लंड यांच्यामध्यें व्यापार

विषयक व वसाहतीविषयक बाबतींत चुरस लागली व संबंध १८ व शतक या चुरशीच्या युद्धांतच गेलें. सरतेशेवटी १८१५ मध्यें नेपोलियनचा पराभव झाल्यानंतर इंग्लंडचें श्रेष्ठत्व प्रस्थापित झालें. यानंतर इंग्लंडशीं बरोबरीच्या नात्यानें स्पर्धा करण्यास कोणतेंही युरोपियन राष्ट्र धजलें नाहीं. तेव्हां असा श्रेष्ठ प्रतीचा दर्जा प्राप्त करून घेतल्यानंतर युरोपातील इतर देशांत चाललेल्या चळवळींकडे आपण लक्ष द्यावें अशी इंग्लंडला साहजिकच इच्छा झाली व तटस्थपणाचें धोरण सोडून देऊन युरोपियन राजकारणांत प्रामुख्यानें भाग घेण्याचें त्यानें ठरविलें.

नेपोलियनच्या पराभवानंतर युरोपच्या राजकारणात रशियाचा बादशहा **अलेक्झांडर** व ऑस्ट्रियाचा मुख्य प्रधान **मॅटर्निक** हे प्रामुख्यानें झळकूं लागून युरोपियन राजकारणाची सूत्रें यांच्याच तंत्रानें हालूं लागली. फ्रान्सच्या राज्यक्रान्तीमुळें उदय पावलेल्या स्वातंत्र्य, समता, विश्वबंधुत्व वगैरे कल्पना व तत्प्रेरित क्रान्तिकारक चळवळी दडपून टाकण्याच्या उद्देशानें ऑस्ट्रिया, रशिया व प्रशिया यानीं **होली अलायन्स** (पवित्र संघ) या नावाचा एक संघ स्थापन केला. पण या संघाची स्पेन, पोर्तुगॉल व नेपल्स आणि अमेरिकेतील स्पॅनिश वसाहती यानीं आपल्यावरील जुलमी सत्ता झुगारून देऊन आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें. तेव्हां या बंडाचा मोड करण्याचा "पवित्र संघानें" बेत करून त्या त्या ठिकाणीं सैन्यही रवाना केलें. तेव्हां या चढेल धोरणाचा इंग्लंडतर्फे **लॉर्ड कॅसलरे** व तदनंतर **कॅनिंग** या परराष्ट्रीय प्रधानांनीं निषेध केला. व स्वतंत्र झालेल्या वसाहतींचें व राष्ट्रांचें स्वातंत्र्य मान्य केलें.

याच सुमारास महमदी धर्मीय टर्कीच्या वर्चस्वाखालीं असलेल्या खिश्चनधर्मीय ग्रीस देशानें टर्कीचें जू झुगारून देण्याच्या हेतूनें बंड